

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १५ वें ] नोव्हेंबर १९६१ [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष पंधरावें
अंक दुसरा

नोव्हेंबर
१९६१

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
‘गणेश भुवन’ २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्. भीमरावचाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४





# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : **डॉ. पी. एल्. वैद्य** एम्. ए., डी. लिट्. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई** ( सातारा )

# सार-संकलन

## माणूस विरुद्ध भूक

आरोग्यवर्धनाचें काम हातीं घेऊन त्यांत यश संपादन करावें, तों वाढत्या वयोमर्यादेच्या प्रजेस पोसण्याकरितां आवश्यक असलेलें अन्न कसें पुरवावें, ही समस्या समोर उभी ठाकते. याकरितां शेतकीच्या सर्व व्यवहारांत आवश्यक ते बदल करणें निकडीचें होऊन बसतें. भारतासारख्या अद्याप कृषिप्रधान असलेल्या देशाला तर ही समस्या अधिकच जिव्हाळ्याची आहे. म्हणून Nature साप्ताहिकाच्या ५ ऑगस्टच्या अंकांत आलेल्या केंब्रिज विद्यापीठाचे सर जोसेफ हचिन्सन व रीडिंग विद्यापीठाचे प्रा. ए. एच्. बंटिंग यांनीं लिहिलेल्या लेखाचें सार पुढें देण्यांत आलें आहे.

'१९१९ सालीं रॉकफेलर फाउंडेशननें मेक्सिकोंत एक सार्वजनिक आरोग्य कार्यक्रम जारी केला. १९४३ सालापर्यंत सतत वाढत्या आरोग्यमानामुळें तेथें एक महान् आधुनिक मानवी समस्या निर्माण केली. शास्त्रीय मृत्यु-नियमनामुळें वाढत्या लोकसंख्येला अन्नपुरवठा करण्याची समस्या. त्याच वर्षी फाउंडेशन व मेक्सिकन सरकार यांनीं परस्पर-सहकार्यानें शेतकी संशोधनाचा एक कार्यक्रम आखला. हा कार्यक्रम इतर देशांकरितां नमुनेदार ठरला आहे. या कार्यक्रमाच्या साहाय्यानें गेल्या दहा वर्षांत झालेल्या तीन टक्के लोकसंख्येच्या वाढीबरोबर अन्नउत्पादनांत सालीना सात टक्के वाढ झाली आहे. ह्या काळांत जगांत इतरत्र कोठेंहि झालेल्या अन्न-उत्पादनांतील वाढीपेक्षां ही अधिक आहे. परंतु १९४८-५२ ते १९५७ या काळांत आशियांतील तांदुळाचें उत्पादन सालीना ३·७ टक्यांनीं वाढलें व राष्ट्रीय चीनमध्यें तें ५·७ टक्यांनीं वाढलें.

फाउंडेशन व मेक्सिकन सरकार यांमधील सहकार्य दोघांनींहि माणसें व संपत्ति पुरविलेल्या Office of Special Studies च्या रूपानें साकार झालें. या Office नें कित्येक ठिकाणीं संशोधन केंद्रें प्रत्यक्ष चालविलीं आहेत व इतर केंद्रांत मार्गदर्शन केलें आहे. प्रारंभीं फाउंडेशननें तज्ज्ञ माणसें पुरविलीं. सुरुवातीपासूनच त्यांनीं मेक्सिकन पदवीधरांना शिकवून तयार करण्याचें काम हातीं घेतलें. प्रारंभीं हें कार्य संशोधन-केंद्रांत चालू केलें व नंतर त्या विद्यार्थ्यांना अमेरिकन विद्यापीठांत पाठविण्यांत आलें. अशाप्रकारें संपूर्णपणें तयार अशीं माणसें अमेरिकन तज्ज्ञांची जागा घेण्यास सज्ज झालीं. वस्तुतः या कार्याच्या विकासामुळें तज्ज्ञ अमेरिकन व्यक्तींची गरज सततच भासत आली आहे; परंतु तरी मेक्सिकन तज्ज्ञ व अमेरिकन तज्ज्ञ यांमधील प्रमाण आरंभापेक्षां वेगळें होत गेलें आहे. १९५९-६० या काळांत एकूण १४७ व्यक्तींपैकीं १३० हून अधिक व्यक्ती मेक्सिकन होत्या, व १९६०सालीं Office of Special Studies व मेक्सिकन राष्ट्रीय शेतकी संशोधन संस्था यांचें एकीकरण करण्याच्या योजना आंखणें शक्य झालें.

'कार्यांची हीच धाटणी १९५० सालापासून कोलंबियांत वापरण्यांत आली, १९५५ सालापासून चिलींत वापरण्यांत आली, व १९५६ सालापासून भारतांत तिचा प्रयोग करण्यांत आला. ह्या अनुभवांतून दोन आंतरराष्ट्रीय कार्यक्रम हातीं घेण्यांत आले आहेत. Inter-American Food Crop Improvement Program आंखण्यांत आला; त्याचें उद्दिष्ट असें कीं अमेरिकेंतील अन्नधान्य संशोधनाच्या व उत्पादनाच्या अनुभवास फाउंडेशनचीं कार्यकारी पथकें नसलेल्या लॅटिन अमेरिकेच्या भागांत प्रत्यक्ष रूप देऊन पहावें. तसेंच फिलिपाइन्समधील International Rice Institute ही फोर्ड फाउंडेशनकडून मदत मिळणारी संस्था आग्नेय आशियांतील तांदुळाचें उत्पादन करणाऱ्या कित्येकांनीं सहकार्यानें चालविलेली संस्था आहे.

"आपल्या या कार्याचा अहवाल रॉकफेलर फाउंडेशननें नुकताच प्रसिद्ध केला आहे ( Program in the Agricultural Sciences, Annual Report 1959-1960 ) हा अहवाल जरी तसा एका








वर्षाच्या कार्यापुरताच मर्यादित असला, तरी कार्यक्रमाचा विकास व त्याची कार्यपद्धति यांची स्पष्ट माहिती त्यांत आली आहे.

' भारतांत फाउंडेशनचे अवघे सहाच सभासद आहेत. तेथील कार्यक्रमाचें सर्वांत महत्त्वाचें अंग म्हणजे १९५८ च्या ऑक्टोबरांत Indian Agricultural Research Institute मध्यें उघडण्यांत आलेलें पदव्युत्तर विद्यालय. १९५९-६० या वर्षी त्या विद्यालयांत १८६ एम्. एस्सी. व ११३ पीएच्. डी. विद्यार्थी दाखल झाले. त्यांचा अभ्यासक्रम वर्गांतील अभ्यास व संशोधन-शिक्षण या दोहोंचा मिळून बनलेला आहे. यापुढें या विद्यालयांत दरवर्षी १०० एम्. एस्सी. व ५० पीएच्. डी. विद्यार्थी घेण्यांत येणार आहेत. या महान् शैक्षणिक प्रयत्नास तंत्रज्ञांचा कारखाना म्हणून उडवून लावणें म्हणजे पदवीधर खूप असलेल्या परंतु तज्ज्ञ व अनुभवी संशोधक नसलेल्या देशांतील अशा कार्यांचें महत्त्व ध्यानीं न आल्यासारखें होईल. पहिली पदवी व संपूर्णपणें जय्यत संशोधक यांतील अंतर भरून काढणें अशा परिस्थितींत अत्यंत बिकट आहे, व भारतांतील विद्यापीठांतील शिक्षणाचा दर्जा एकच नसल्यानें अडचणींत आणखीच भर पडते. आवश्यक तें उच्च शिक्षण देण्याकरितां म्हणूनच निव्वळ नव्हे, तर आरंभापासूनच वेगळा शैक्षणिक दर्जा असणारीं माणसें तयार करण्याकरितां लागणारें वैयक्तिक लक्ष पुरविण्यासाठीं म्हणून अशा पदव्युत्तर विद्यालयाची आवश्यकता आहे. भारताची गरज भागविण्याच्या कामीं Indian Agricultural Research Institute चें हें पदव्युत्तर विद्यालय महत्त्वाची भूमिका पार पाडेल, यांत शंका नाहीं. '

## पूर्वेंतील फ्रेंच वारसा

स्वतंत्र झालेल्या वसाहतींना आर्थिक व तांत्रिक साहाय्य दिलें म्हणजे या वसाहतींचे आपल्या पूर्वींच्या राज्यकर्त्यांशीं असलेले संबंध दुरावतील, अशी अमेरिकनांची समजूत दिसते. परंतु मूलभूत सांस्कृतिक भेदामुळें राज्यकर्त्यांची वसाहतींतील सत्ता ही निव्वळ राजकीय सत्ता नसते. ते आपला सांस्कृतिक वारसाहि आपोआपच वसाहतींना देऊन टाकीत असतात. ही परिस्थिति आज भारतांतहि आढळून येते. ती इंडोचीनमध्येंहि असावी, यांत नवल तें काय ? याचें विवेचन The Times Weekly Review च्या आग्नेय-आशियांतील वार्ताहरानें त्या साप्ताहिकाच्या १० ऑगस्टच्या अंकांत केलें आहे. तें येथें संक्षेपानें देण्यांत आलें आहे.

' साम्राज्यवादी सत्ता जेव्हां आपल्या वसाहतींना स्वातंत्र्य बहाल करते, तेव्हां ती आपल्या मागें दोन वारसे ठेवून जाते – एक उघड दिसणारा व दुसरा उघड न दिसणारा. इंग्रज किंवा फ्रेंच इंजिनियरांनीं तयार केलेले रस्ते वा बांधलेलीं बंदरें एकसारखींच दिसतात. परंतु विचार करण्याच्या संवयी व प्रद्धती यांमध्यें फार फरक पडतो. भारताला भेट देणाऱ्या पाहुण्याला लौकर सकाळीं चहाचा कप नक्कींच दिला जातो आणि त्याबरोबर व्यवस्थित घडी घातलेलें इंग्रजी भाषेंतलें वृत्तपत्रहि असतेंच. त्या वृत्तपत्रांतील अग्रलेख व वार्तांनाहि व्हिक्टोरियन भारदस्तपणा असेल, त्यांची चव खास ब्रिटिश असेल. अशाप्रकारचा कोणता वारसा फ्रेंचांनीं इंडोचीनमध्यें ठेवला आहे ?

' दूरच्या खेडेगांवांतहि चविष्ट कुरकुरीत पाव मिळणें किंवा सायगांवच्या हॉटेलांतील स्नानगृहांत bidets असणें – या अगदीं वरवरच्या गोष्टी झाल्या. फ्रेंचांचा प्रभाव अधिक खोलवर पडला आहे. जिनीव्हा करारानंतर सहा वर्षांनीं Vientiane येथें शैक्षणिक योजनांची चर्चा करणाऱ्या परिषदेसमोर असलेल्या शिफारसी फ्रेंच भाषेंत लिहिलेल्या असतात. लाओ ही भाषा तांत्रिक परिभाषेच्या दृष्टीनें संपन्न नाहीं, हें त्याचें कारण नव्हे ( सयाममध्यें हीच समस्या संस्कृत भाषेंतून शब्द उचलून सोडविण्यांत आली आहे. ), तर परिषदेचे सभासद एकतर फ्रान्समध्यें किंवा युद्धपूर्व हॅनॉई विद्यापीठांत शिक्षण घेतलेले होते, हें आहे. स्वातंत्र्याकरतां सर्वांत तीव्र लढा देणाऱ्या व्हिएटनाममध्यें फ्रेंचांचा बौद्धिक प्रभावहि तितकाच गभीर आढळावा, हा अंतर्विरोधच म्हटला पाहिजे. उत्तर व्हिएटनाममध्यें सुद्धां फ्रेंच पार्श्वभूमि असलेली लढाऊ क्रांतिकारकांची जुनी पिढी व मॉस्कोंत शिक्षण घेतलेली नवी पिढी, यांच्यांत दुरावा निर्माण होत असल्याचीं चिन्हें आढळतात.








इंडोचीनच्या जनतेनें फ्रेंचाविरुद्ध शेवटपर्यंत राजकीय लढा दिला आहे, तेव्हां फ्रेंचांचें सर्वकांहीं ते झिडकारतील, असें समजण्यांत अमेरिकेनें भयंकर घोडचूक केली. व्हिएटनाममध्यें फ्रेंच मुळींच लोकप्रिय नव्हते, हें खरें; कारण व्हिएटनामची यथेच्छ पिळवणूक फ्रान्सनें केली. लाओस आणि कंबोडियांत पिळवणूक करण्याजोगें असें विशेष नव्हतेंच, त्यामुळें फ्रेंच लोक सहानुभूतिशील, कमळांच्या त्या देशामुळें पुरेसे मोहित होऊन अफू ओढायला ना म्हणणार नाहींत, असा त्या लोकांचा अनुभव. आणि दरम्यान परत Ecole Francaise de l'Extreme Orient च्या करवीं रानटी टोळ्यांचा अभ्यास व उत्खननें चालूच होतीं.

'हें कार्य स्वातंत्र्य मिळाल्यावर संपुष्टांत आलें नाहीं. मागसल्या देशांना सहाय्य करण्यांत फ्रान्स उदार आहे; अर्थात् ही मदत प्रामुख्यानें फ्रान्सच्या पूर्वीच्या वसाहतींना मिळते, हें स्वाभाविकच होय. गेल्या डिसेंबर महिन्यांत Vientiane येथें चकमकी उडल्यामुळें इवल्याशा लाओसमधून फ्रेंच शिक्षणतज्ज्ञांना हलावें लागलें, तेव्हां चारशे शिक्षकांनीं बँकॉक येथ तात्पुरता आश्रय घेतला. लाओस आणि कंबोडिया या देशांत १९५६ सालीं जितक्या फ्रेंच व्यक्ती व्यापार-उद्योगांत गुंतलेल्या होत्या, त्यापेक्षां आज त्यांची संख्या अधिक आहे. दक्षिण व्हिएटनाममध्येंहि फ्रेंचांची संख्या तेवढींच भरेल. ( उत्तर व्हिएटनाममध्यें सुद्धां हॅनॉई विद्यापीठांत फ्रेंच प्राध्यापक अद्याप शिकवीत आहेतच.) अमेरिकेच्या आर्थिक व लष्करी प्रचंड मदतीनं कम्युनिस्ट नसलेल्या इंडोचीनमधील फ्रेंचांच्या प्रभावाला मुळीं धक्का पोंचलेला नाहीं.

'आपलें स्थान टिकवून धरण्याकरितां फ्रेंचांना खूपच अनुकूलता आहे. इंडोचीनमध्यें कामाकरितां फ्रेंच व्यक्तीला भरती करणें, हें अमेरिकन माणसाला भरती करण्यापेक्षां कितीतरी सोपें आहे. फ्रेंचांचें जीवनमान कमी दर्जाचें असल्यामुळें फ्रेंच माणूस कमी पगारावरहि काम स्वीकारूं शकतो, हेंच कांहीं त्याचें एकमात्र कारण नव्हे. कित्येक फ्रेंच कुटुंबांत इंडोचीनमध्यें नोकरी करणें ही एक प्रथाच पडून गेली आहे, व ही प्रथा इंडोचीन स्वतंत्र झाल्यानंतरहि टिकवून धरण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें फ्रेंचांनीं पूर्वी राजकीय दडपशाही काय वाटेल ती केली असेल, परंतु त्यांनीं कधींच जातीयता दाखविलेली नाहीं. राजपुत्र सुवानाची पत्नी ही अर्ध-फ्रेंच आहे आणि इंडोचीनमधील कित्येक प्रतिष्ठित व्यक्तींचे नात्यागोत्याचे संबंध फ्रान्सशीं आहेत. राज्यकारभारांत नोकरी करणाऱ्या कित्येक फ्रेंच व्यक्तींनीं इंडोचीनमधील चांगल्या कुळांतील मुलींशीं विवाह करून सेवानिवृत्तीनंतर फ्रान्समध्यें स्थायिक होतांना त्यांच्या बायकाहि त्यांच्याबरोबरच गेल्या आहेत.

'हें सर्व येथें सांगणें प्राप्त झालें, कारण इंडोचीनमध्यें फ्रेंच व अमेरिकन लोकांत असलेली कडवट स्पर्धा, जी कित्येकदां उघड उघड शत्रुत्वाचें रूप घेते, विशेष चर्चिली जात नाहीं. इंडोचीनमधील फ्रेंच-अमेरिकन संघर्ष निव्वळ राजकीय धोरणामुळें उद्भवलेला नाहीं; त्याचीं मुळें अधिक खोल रुजलीं आहेत. ह्या सुंदर भूप्रदेशाबद्दल फ्रेंचांना एक आसक्ति आहे व त्यांतील शिक्षित वर्ग अंशतः आपणच घडविला आहे, असें त्यांना वाटतें. त्यांच्या अनुभवांच्या ह्या भांडाराकडे दुर्लक्ष करणें, ही एक घोडचूकच ठरेल.'

## सिंगापूरचा सुप्त ज्वालामुखी

जगभर समस्यांचा बुजबुजाट झाला आहे. सारें जग इतकें लहान झालें आहे, लोक व सरकारें परस्परांच्या इतकीं जवळ आलीं आहेत, कीं एकाची समस्या ही एकाची राहूंच शकत नाहीं. एका समस्येंत चार माणसें गोंवलीं गेल्यानें गोंधळ आणखीनच वाढतो. अशा परिस्थितींत, दुर्लक्षिल्या गेलेल्या वा जात असलेल्या एकाद्या समस्येकडे मुद्दाम होऊन लक्ष वेधणें, हा एक thankless job आहे, हें श्री. जॉन स्ट्रॅची यांचें विधान खरें आहे. सिंगापूरमध्यें उद्भवूं पाहणाऱ्या एका विराट् समस्येचें विवेचन त्यांनीं New states-Man च्या १८ ऑगस्टच्या अंकांत केलें आहे. त्याचा संक्षेप पुढें दिला आहे.

'समस्यांनीं ग्रासलेल्या आजच्या जगांत आणखी एका समस्येकडे लोकांचें लक्ष वेधविणें, हें कर्म धन्यवाद पदरांत टाकणारें नाहीं. परंतु तरी आग्नेय आशियांत एक समस्या उभी रहात आहे व आज-ना-उद्यां आपल्याला तिला तोंड द्यावें लागेल. एकाच वाक्यांत सांगावयाचें झाल्यास, सिंगापूरच्या शहर-







राज्यांत लोकशाही शासनसंस्था टिकून रहाणें बिकट होत चाललें आहे. तेथील लोकशाही शासनपद्धति जर संपूर्णपणें कोलमडली, तर त्यामुळें सबंध आग्नेय आशियांत संघर्ष माजण्याची शक्यता आहे.

'सिंगापुरांतील लोकशाही शासनपद्धति कां ढांसळूं लागली आहे ? याचें पहिलें कारण असें, कीं तेथील पंचाहत्तर टक्के नागरिकांना सिंगापूर हें चिनी शहर आहे असें वाटतें. सिंगापूरचे बहुसंख्य नागरीक कम्युनिस्ट आहेत म्हणून नव्हे, तर ते चिनी आहेत, म्हणून परिस्थिति अशी स्फोटक बनली आहे, असें मला वाटतें. कम्युनिस्ट चीनमधील परिस्थिती-विषयीं सिंगापूरच्या नागरिकांना उत्साह नाहीं, असें तज्ज्ञांचें मत आहे. त्यांचे बरेचसे नातेवाईक कम्युनिस्ट चीनमध्यें आहेत, त्यांना नेहमींच खाद्य-पदार्थांचीं पार्सलें पाठवावीं लागतात, खूप खटपट करून त्यांच्यापैकीं एकाला चीनमधून बाहेर आणावें लागतें. त्यांना उत्साह जर कशाबद्दल असेल, तर तो चीनबद्दल आहे. पांच हजार वर्षांचें विनायास, उद्धट वर्चस्व —यामुळें चिनी जनतेच्या सांप्रतच्या पुनरुत्थानास अकल्पित बळ आलें आहे.

'दुसरें कारण असें, कीं सिंगापूरच्या शहर-राज्याला इतरांनीं हेवा करावा अशा स्वतंत्र भवितव्याची आशा फारच थोडी असूं शकेल. ही नगरी फार लहान आहे, तेथील वस्ती फार दाट आहे, मलायाच्या आर्थिक जीवनाशीं ती फारच निगडित झाली आहे. आणि तिसरें कारण असें, कीं सिंगापूरची सांप्रतची प्रतिष्ठा वा अवस्था ही उघडपणेंच तात्पुरती व असमाधानकारक आहे.

लोकशाही पद्धतीनें निवडलेल्या परंतु केवळ अर्ध–स्वतंत्र अशा सिंगापूरच्या सध्यांच्या सरकारनें The End of Empire या माझ्या अलीकडील ग्रंथाच्या विषयावर व्याख्यानें देण्याकरितां म्हणून ह्या एप्रिल व मे महिन्यांत मला पाचारण केलें होतें. माझ्या तेथील वास्तव्याच्या अखेरीस मी अशा निर्णयाप्रत येऊन पोहोंचलों, कीं सिंगापुरांतील सद्यःस्थितीला अधिक यथार्थपणें the Fag–End of Empire असें म्हणावें हेंच बरें. यांत दोष असा कोणाचाच नाहीं, परंतु सिंगापुरची सांप्रतची अर्ध–वसाहती स्थिति नितांत असमाधान-कारक आहे खास.

'या तीन प्रमुख कारणांमुळें व इतर अनेक कारणांमुळें Peoples Action Party नें बनविलेलें व श्री. ली. कुआन यू हे कर्णधार असलेलें सरकार उत्तरोत्तर वाढत्या अडचणींना तोंड देत आहे. दोन महत्त्वाच्या उपनिवडणुकांत सरकार-पक्षानें हार खाल्ली आहे व त्यामुळें PAP त फाटाफूट पडूं लागली आहे. PAP हा खरोखरच वसाहतवादाला कट्टर विरोध करणारा पक्ष आहे, परंतु तितकाच त्याच्यावर कम्युनिस्टविरोधाचाहि पगडा आहे, व असें असूनहि त्यांत कांहीं अंशानं कम्युनिस्टांचा व कम्युनिस्टांच्या समर्थकांचा भरणा आहे. हेच लोक आतां फूटून निघाले आहेत. व नानामतांचे सार्वजनिक लोक त्यांना येऊन मिळाले आहेत. पूर्वी विधिमंडळांत प्रचंड बहुमत असलेला PAP आतां फक्त कसाबसाच बहुमत टिकवून आहे.

'मलायाचे पंतप्रधान श्री. टुंकू अब्दुल रहमान यांनीं सिंगापूरच्या दिशेनें टाकलेल्या तडजोडीच्या नव्या पावलानें परिस्थिति या थराला पोहोचली आहे, ही गोष्ट सकृद्दर्शनीं विचित्र वाटते. सिंगापूर शहर, सारावाक, ब्रिटिश उत्तर बोर्निओ व ब्रुनी हा ब्रिटिश बोर्निओचा प्रदेश व मलायाचें प्रजासत्ताक अशा सर्वांचें मिळून एक राज्य करावें अशी कल्पना गेल्या २७ मे रोजीं त्यांना सुचली. अशा स्वरूपाच्या कल्पना प्रत्यक्षांत आणण्याकरितां श्री. ली कुवान यू नेहमींच खटपट करीत आले आहेत. श्री. टुंकूहि याच गोटांत सामिल झाल्याबरोबर PAP ची एकजूट कसाला लागली, व कम्युनिस्टांचे समर्थक व विरोधक यांच्यांत फाटाफूट पडली. हें जरी नाट्यपूर्ण होतें, तरी त्यांत अनपेक्षित असें कांहींच नव्हतें. कारण अशा रीतीनें मलाया, सिंगापूर व बोर्निओ प्रदेश एकत्र आल्यामुळें आर्थिक दृष्ट्या मजबूत असें अकम्युनिस्ट स्वतंत्र राष्ट्र-आग्नेय आशियांत जन्मास येईल. चिनी वर्चस्वाला हा एकमात्र व्यवहार्य पर्याय आहे.

'अशा स्वरूपाच्या राज्यांत सिंगापूर बरोबर बोर्निओच्या प्रदेशाचा अंतर्भाव करण्याचा विचार श्री. टिंकू करतात, याचें कारण असें कीं बोर्निओ प्रदेश वगळून परंतु सिंगापूर जवळ करून होणाऱ्या राज्याची लोकसंख्या बहुसंख्येनें चिनी असेल-सांप्रत मलयी वा मलायी व भारतीय बहुसंख्येनें आहेत. सिंगापुरांतील








सार्वजनिक व्यक्तींना अशाच स्वरूपाच्या एखाद्या योजनेस आपला पाठिंबा असल्याचें जाहीर करावें लागेल, किंवा चिनी सरकारचे व सिंगापुरांतील बेकायदेशीर परंतु धोकेबाज कम्युनिस्ट पक्षाचें नेतृत्व स्वीकारावें लागेल.

' या अर्ध-वसाहतींतील ब्रिटिश अधिकाऱ्यांपुढें फक्त एकच पर्याय आहे: ही विशाल राज्याची कल्पना जर मूर्त रूप धारण करूं शकली नाहीं, तर परत सिंगापूरवर आपलें आधिपत्य स्थापन करणें किंवा सिंगापूरमधील आपला लष्करी तळ उठविणें.

'परिस्थितीची रूपरेखा ही अशी आहे; यांत सुलभीकरण आलें आहे, हें खरेंच. आतां, ही परिस्थिति किती महत्वाची आहे, हा खरा प्रश्न आहे. प्रथमतः, इंग्लंडच्या दृष्टीनें, सिंगापूरचा लष्करी तळ उठविण्यांत आपल्याला भयंकर धोका आहेसें व्यक्तिशः मला वाटत नाहीं. हा तळ तेथें ठेवणें, हें काम अतिशय खर्चाचें आहे व शिवाय आग्नेय आशियांतील अन्य कोण्या भागांत कांहीं संघर्ष उद्भवल्यास या तळावरील लष्कराचा उपयोग करणें राजकीयदृष्ट्या शक्य कोटींतील नाहीं.

'दुसरें, सिंगापूरच्या दृष्टीनें, या प्रश्नाला अपरिमित महत्त्व आहे. मलाया किंवा ब्रिटिश बोर्निओ प्रदेशाशीं सिंगापूर जोंपर्यंत युक्त होत नाहीं, तोंपर्यंत तें ह्या लष्करी तळामुळेंच तगून आहे असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं; ब्रिटिश लोक तेथून हलले, तर सिंगापुरांत प्रचंड प्रमाणावर बेकारी दिसूं लागेल.

' आणि जगाच्या दृष्टीनेंहि, या समस्येला बरेंचसें महत्त्व आहे, असें मला वाटतें. प्रथमदर्शनीं असें वाटेल, कीं सिंगापुरांतील चिन्यांना स्वतःच्या इच्छेनुरूप कम्युनिस्ट होऊं दिलें पाहिजे, व आपल्या मातृभूमींतील सरकारच्या आज्ञांप्रमाणें वागूं दिलें पाहिजे. परंतु चिनी कम्युनिस्टांना सिंगापूरचा ताबा मिळाला, तर काय-काय घडणें शक्य आहे, याचा विचार करणें आवश्यक आहे.

' कांहीं झालें तरी सिंगापूर मलायांत आहे, चीनमध्यें नाहीं; सिंगापुरांत चिन्यांच्या मानानें ल्हान परंतु उत्साही मलायी समाज आहे; आणि मलायाच्या प्रजासत्ताकांत मलायी लोकांचें बहुमत आहे. शिवाय, मलाया ही आपली मातृभूमि आहे, असें मलायी लोकांना स्वाभाविकतःच वाटतें. व मलायांतील स्वतंत्र सरकार मलायाची उन्नति करण्यांत यशस्वी ठरलें आहे. सिंगापूरच्या चिनी कम्युनिस्टांपुढें वा इतर कोणापुढेंहि मान तुकविण्यास मलायी जनता तयार होणार नाहीं, ही वस्तुस्थिति आग्नेय आशियांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांतून मलायांत गेलेल्या व्यक्तीच्या निदर्शनास आल्यावांचून राहणार नाहीं. शिवाय, एक गोष्ट आपल्याला सांगायला मलायी लोक कधींच विसरत नाहींत. ती अशी, कीं सिंगापूरला पाणी पुरवठा मलायांतून होतो; मलायांतून सिंगापूरवर सहज आक्रमण करतां येईल. मलायाचें प्रजासत्ताक जोंपर्यंत मलायी लोकांच्या हातांत आहे, तोंपर्यंत मलायी लोक सिंगापुरांत चिनी कम्युनिस्ट सरकार येऊं देणार नाहींत, यांत शंकाच नाहीं.

' परंतु, सिंगापुरांत स्वतंत्र, चीनच्या बाजूचें व कम्युनिस्टांच्या समर्थकांचें सरकार जरी आलें, तरी मलायाच्या प्रजासत्ताकाला शस्त्रें उचलावीं लागतील, यावरून परिस्थिति किती गुंतागुंतीची आहे, हें ध्यानीं यावें. सिंगापुरांतील चिनी बाजूला झुकणारें, कम्युनिस्ट वळणाच्या सरकारवर मलायाचा सशस्त्र हल्ला झाल्यास लाल चीन गप्प बसेल काय ? इंडोनेशियांत काय होईल ? आणि लाल चीन मध्यें पडल्यास अमेरिका स्वस्थ बसूं शकेल काय ? किंबहुना, भारत सरकारहि तिकडे कानाडोळा करूं शकूं शकेल काय ? कारण, आशियांतील चिनी व भारतीय प्रभावाच्या दरम्यानच्या या भूमीवर दोघांपैकीं कोणाचीच सत्ता नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे, कीं सिंगापुरांतील अकम्युनिस्ट सरकार एकदां कोंसळलें, कीं सबंध आग्नेय आशियांत वणवा भडकेल.

## बर्लीन प्रश्नांतील मेख

तिसरें महायुद्ध पेटेल कीं काय अशी भीति वाटावी, अशा बर्लीनच्या समस्येमागें कोणतें राजकारण दडलेलें आहे, याबद्दल देशोदेशींच्या वृत्तपत्रांतून वेगवेगळे दृष्टिकोन मांडण्यांत येत आहेत. त्यांतून कांहीं निष्कर्ष निघतातच. त्या सर्वांचा एकत्रित विचार करून The Radical Humanist या साप्ताहिकाच्या १७ सेप्टेंबरच्या अंकांत एक संपादकीय टीप आली आहे. तिचा मथितार्थ असा—







' बेलग्रेड येथील तटस्थ राष्ट्रांच्या परिषदेचें कामकाज संपुष्टांत येत असतांनाच रशियानें परत अणु-चांचण्या सुरू करण्याची घोषणा केली. २८ ऑगस्ट १९५९ रोजीं प्रकाशित केलेल्या पत्रकांत रशियन सरकारनें असें म्हटलें होतें, कीं पश्चिमी राष्ट्रांनीं अणु व हायड्रोजन अस्त्रांच्या चांचण्या सुरू केल्या नाहींत तर रशियानेंहि त्या सुरू करूं नयेत, असें रशियन मंत्रीमंडळानें ठरविलें आहे. मात्र पश्चिमी राष्ट्रांनीं अण्वस्त्रांच्या चांचण्या घेण्यास परत आरंभ केल्यास स्वतःवर लादून घेतलेल्या या बंधनांतून रशिया मुक्त होईल. '

' जिनीव्हा-परिषदेच्या आरंभदिनापासून, म्हणजे ३१ ऑक्टोबर १९५८ पासून, इंग्लंड-अमेरिकेनें अण्वस्त्रांच्या चांचण्या घेतलेल्या नाहींत. ही परिषद् चालू असतांना पहिल्याच आठवड्यांत रशियानें दोन चांचण्या उरकल्या.

' आतां ह्या अलीकडील रशियन घोषणेमुळें सर्वत्र निराशा पसरली आहे. एव्हांना रशियानें तीन चांचण्या पार पाडल्या आहेत.

' याबाबत देशोदेशींच्या वृत्तपत्रांनीं आपापले निष्कर्ष व अनुमानें मांडलीं आहेत. त्यांत New Reporter च्या २४ जुलै १९६१ च्या अंकांत आलेला श्री. जॉं डॅनिएल यांचा लेख उद्बोधक आहे. वॉशिंग्टनमध्यें पश्चिमी मुत्सद्यांच्या व राष्ट्रदूतांच्या बैठकीनंतर व व्हिएन्ना व पॅरिस येथील विविध मंत्र्यांच्या बैठकीनंतर फ्रेंच, इंग्लिश, अमेरिकन व जर्मन यांच्यांत, तोडग्याबद्दल नाहीं तरी, बर्लीन-समस्येच्या विश्लेषणाबाबत एकमत झालें आहे असें वाटतें.

' प्रथमतः एक गोष्ट आतां निश्चित वाटते, कीं ह्या वर्षअखेरीपर्यंत क्रुश्चेव अतिशय अटीतटीची परिस्थिति ओढवून घेईल. ह्या विधानांतील दृढता क्रुश्चेव्हनें अलीकडे केलेल्या जळजळीत भाषणांवरच निव्वळ आधारलेली नाहीं, तर कित्येक तज्ज्ञांनीं दिलेल्या रशियाच्या अंतर्गत परिस्थितीच्या वृत्तावर आधारलेली आहे. व ह्या वृत्ताबाबत सर्व तज्ज्ञांचें एकमत आहे. स्टालीन व चीन यांच्या अनुयायांच्या क्रुश्चेव-विरोधाला परत भरतें आलें आहे. पॉलिट ब्युरो, कम्युनिस्ट पक्ष, व प्रत्येक सोव्हिएट प्रजासत्ताकाच्या मुख्य कचेरींत ही एकच अवस्था आहे. क्रुश्चेव्हला जर तगून राहावयाचें असेल तर आपल्या निःस्टालिनीकरणाच्या योजनेची मजल त्याला वाढवावी लागेल, असा क्षण आला आहे; वेगळ्या शब्दांत सांगावयाचें, तर स्टालिनोत्तर काळांत रशियानें अनुभविलेल्या शिरकाणापेक्षां अधिक विध्वंसक उपाय त्याला योजावे लागतील. माओ त्से-तुंग व क्रुश्चेव्ह यांच्यामधील मतभेदांमुळें क्रुश्चेव्ह अडचणींत सांपडतो, असें भरमसाट सांगितलें गेलें आहे; पण वस्तुस्थिति अशी आहे कीं क्रुश्चेव्हच्या विरोधकांना खुद्द रशियांत, परदेशांतील ( विशेषतः फ्रान्स व आफ्रिकेमधील ) कम्युनिस्ट पक्षांत व चीनमध्यें जो अनुनय मिळतो, त्यामुळें क्रुश्चेव्ह खोड्यांत सांपडतो. आणि शिरकाण करावयाचेंच असेल तरी अजोड आंतरराष्ट्रीय तणातणीची किंवा नेत्रदीपक यशाची परिस्थिति असल्याशिवाय तें जमणारें नाहीं.

' अवकाश-भ्रमण, राष्ट्रसंघांतील चकमकी, क्यूबा किंवा लाओसमध्यें शाब्दिक हस्तक्षेप-हे सर्व उपाय आतां कुचकामी आहेत. विरोधकांचा पाडाव आतां त्यांच्या भूमीवरच, म्हणजे पश्चिम-विरोधाच्या क्षेत्रांतच, केला पाहिजे. परंतु हें घडून यावयाचें, तर त्याकरितां स्थानिक बाबींत वृत्ति बेडर झाली पाहिजे, व भांडवलवादी व साम्यवादी गुण्यागोविंदानें एकत्र राहूं शकतात हें तत्त्व संशयास्पद झालें पाहिजे. युद्धाच्या भीतीबाबत जनमत जागरूक करणाऱ्या तणातणीच्या चौकटींत क्रुश्चेव्ह एकीकडे आपल्या विरोधकांचें शिरकाण उरकूं शकेल व दुसरीकडे असें जगाच्या दृष्टोत्पत्तीस आणून देऊं शकेल, कीं जनमत-कम्युनिस्ट जनमत देखील-अणुसंघर्षाची भीति बाळगून आहे.

' हें विवेचन जर साधार असेल-व तें साधार आहे असेंच वाटतें-व अटीतटीची जागतिक परिस्थिति निर्माण करण्याच्या क्रुश्चेव्हच्या प्रयत्नांमागील कारणें जर अंतर्गत असतील, तर मग एक महान् संकट वास्तविकच आपल्यापुढें उभें ठाकलें आहे. अशा परिस्थितींत रशियन लोक वाटेल त्या मर्यादेपर्यंत जातील, याची आपण खात्री बाळगावी. ही मर्यादा काय असेल ? बर्लीन समस्येच्या निमित्तानें समांतर असे स्थानिक संघर्ष जगांत सर्वत्र पेरत जावयाचे, ही क्रुश्चेव्हची रीत आहे. अशा प्रत्येक स्थानिक संघर्षांत क्रुश्चेव्ह आपण थापा मारीत नसल्याचें प्रात्यक्षिक देईल

व बर्लीन-समस्येबाबत आपल्याला निकड आहे अशी पश्चिमी राष्ट्रांची खात्री पटविण्याकरितां त्यांना केवळ धमक्या देण्यावर आपण आतां संतोष मानूं शकत नाहीं, असें तो जगाच्या दृष्टोत्पत्तीस आणून देईल.

'या नव्या मोहिमेच्या पहिल्या टप्प्यांत क्रुश्चेव्ह शहाणपणानें पावलें टाकील, हें उघडच आहे. उदाहरणार्थ, क्यूबांत हस्तक्षेप करण्याच्या बाबतींत क्रुश्चेव्ह यापेक्षां अधिक मजल मारणार नाहीं, असें विधान सिनेटर हंफ्रे यांनीं पॅरीसमध्यें फ्रान्सच्या राजकीय गोटांतील महत्त्वाच्या कित्येक असामींशीं बोलतांना केलें. परंतु द् गोल यांना असा विश्वास वाटतो, कीं लाओस-अल्जेरिया–मध्यपूर्व या ठिकाणीं आणि निःशस्त्रीकरण परिषदेंत व राष्ट्रसंघाच्या येत्या बैठकींत थंड्या युद्धास पुन्हां सुरुवात झाल्याचें प्रेक्षणीय दृश्य आपणांस पहावयास मिळेल. उत्तर कोरिया व रशिया यांत वेगळा शांति-तह उरकून घेण्यांत आला, हें याचें पहिलें लक्षण आहे. हा करार उत्तर कोरियन सरकारच्या फायद्याचा आहे, याचीहि खात्री नसल्यानें, तो उरकून घेण्यांत दुसरें कोणतेंच उद्दिष्ट असणें शक्य नाहीं.

'युगोस्लाव्हिया, भारत व इतर सर्व तटस्थ देशांना क्रुश्चेव्हनें दिलेला पाठिंबा लक्षांत घेतां व या देशांबाबत चीनच्या धोरणाचे परिणाम जमेस धरतां, रशियाच्या ह्या डावपेंचांत चीन हेंहि एक लक्ष्य असल्याचें आढळून येईल.

'परंतु जर्मनीच्या प्रश्नाची नेमकी गत काय होईल? क्रुश्चेव्ह पूर्व जर्मनीशीं वेगळा शांति-करार करेल, ही गोष्ट जवळ जवळ निश्चित आहे. नंतर पश्चिम जर्मनी व बर्लीनच्या दरम्यान ये-जा करणाऱ्या दोस्तराष्ट्रांच्या लष्करी व्यक्तींना परवाने देण्याचा अधिकार रशियनांऐवजीं जर्मनांच्या हातीं देण्याबाबत पूर्व जर्मनी आग्रह धरेल. आणि नंतर काय होईल?

'पाश्चिमात्यांनीं राजकीय मान्यता न दिलेल्या देशाची (पूर्व जर्मनीची) कोणतीहि विनंती आपण धुडकावून लावावी, असें द् गोलना वाटतें. या मुद्यावर आपल्या पॅरीसच्या भेटींत प्रे. केनेडींनीं आपण सहमत असल्याचें सांगितलें. तत्त्वतः इंग्लंडलाहि हें मान्य आहे, परंतु गेले कित्येक आठवडे कमी-अधिक प्रमाणांत अधिकृत परंतु सर्वतोपरी महत्त्वाच्या व्यक्तींनीं modus vivendi ची शक्यता बोलून दाखविल्याचें वृत्त आहे; यामुळें पूर्व जर्मनीला पश्चिमी राष्ट्रांकडून जी राजकीय मान्यता मिळेल, ती de facto असली तरी de jure नसेल. परंतु असें न होतां, पूर्व जर्मनीशीं कोणतेच संबंध ठेवावयाचे नाहींत, असें पश्चिमी राष्ट्रांनीं एकमतानें ठरविलें, तर मग बर्लीनला अन्नपुरवठा करण्याकरितां विमानमार्गाचा अवलंब करावा लागेल. आणि जर अशा विमानफेरींत दोस्तांचें एकादें विमान पूर्व जर्मनीनें पाडलें, तर मग निषेधपर खलित्यांच्या शिवीगाळींतून महायुद्धास तोंड फुटण्याची शक्यता आहे. असें कांहीं होणार नाहीं, याची जनरल द् गोलना खात्री आहे. दोस्त-राष्ट्रांत फाटाफूट नाहीं व १९४८ सालपेक्षांहि भक्कम व तत्पर असे विमानतळ ते उभारतील, अशी जर क्रुश्चेव्हची खात्री पटली, तर युद्ध होणार नाहीं, असें द् गोल यांचें म्हणणें आहे.

'इंग्लंडमधील मार्शल माँटगोमरी व फ्रान्समधील भूतपूर्व मंत्री ज्यूल मॉश यांचें मत नेमकें उलटें आहे. युद्धाचा गंभीर धोका आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. पूर्व जर्मनी व पश्चिम जर्मनी या दोन्ही राष्ट्रांना एकसमयावच्छेदेंकरूनच राजकीय मान्यता द्यावी, राष्ट्रसंघांत दाखल करून घ्यावें व वाटाघाटी करून कांहीं करून शांतता भंगूं देऊं नये, असें श्री. मॉश यांचें मत आहे. या मतास श्री. मॅकमिलन यांचा पाठिंबा मिळेल, अशी श्री. मॉश यांची अटकळ आहे.

हीं सर्व मतें क्रुश्चेव्हला पुरीं माहित आहेत. अलीकडील एका पत्रकांत (नांवें न घेतां) त्यानें तीं उल्लेखिलींहि होतीं. पश्चिमी राष्ट्रांतील फाटाफुटीचा असा फायदा रशियानें करून घ्यावा, हें द् गोलना रुचत नाहीं; आपण दुसऱ्या म्युनिचची वाटचाल करीत आहोंत, अशी त्यांची खात्री पटली आहे व असें ते खाजगी संभाषणांत बोलूनहि दाखवितात. फ्रान्सनें दृढ भूमिका घ्यावी, असें त्यांना वाटतें. हेमंत लागण्यापूर्वींच अल्जेरियन प्रश्नाची उकल व्हावी, असें त्यांना वाटतें. आतां नव्यानें सुरू होणाऱ्या वाटाघाटींत ह्याचा कांहीं निर्णय लागेल, अशी आशा बाळगण्यास वाव आहे. फ्रेंच सरकार FLN ला मान्यताहि देऊन टाकील अशी शक्यता आहे.'








## ऐतिहासिक दृष्टींतून क्रांतीचें युग

सामान्य नागरीक आंतरराष्ट्रीय संबंधांचा विचार अनेक मार्गांनीं करूं शकतो, व सध्यां तर वेगवेगळ्या वसाहती स्वतंत्र होत आहेत किंवा होऊं पहात आहेत तर कित्येक नुकत्याच स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांत सशस्त्र क्रांत्या होत आहेत, तेव्हां सामान्य नागरीक या सर्व घटनांमुळें भांबावून गेल्यास नवल नाहीं. Foreign Affairs या अमेरिकन त्रैमासिकाच्या जुलै महिन्याच्या अंकांतील श्री. हेन्री एम्. रिस्टन यांचा लेख या बाबतींत उद्बोधक आहे. त्या लेखाचा सारांश असा—

'सामान्य नागरीक आंतरराष्ट्रीय संबंधांचा विचार अनेक मार्गांनीं करूं शकतो, त्यापैकीं तीन विशेषतः उल्लेखनीय आहेत : ज्ञान, भावना आणि कल्पनाशक्ति. यांतील शेवटल्या-कल्पनाशक्तीच्या—मार्गाचा विशेष विचार केला गेला पाहिजे, कारण खळबळ माजलेल्या जगांतील व्यवहार समजून घेण्यास तो अत्यंत सहाय्य करतो, विशेषेंकरून नव्या व मागसलेल्या व अस्थिर अशा राष्ट्रांशीं व्यवहार करतांना त्याच्याइतका श्रेयस्कर असा दुसरा मार्गच नाहीं.

'ज्ञान हा पहिला मार्ग होय; तें निर्माण करण्याची प्रक्रिया पांडित्य ही होय. स्थल-काल किंवा विचाराच्या क्षेत्रांतील —किंवा या तीनहि क्षेत्रांतील धोरणाचा कोणता तरी एकच पैलू विशेषरीत्या समजणारी विज्ञ व्यक्ति या प्रक्रियेनें तयार होते. शांतिशोधनांतील प्रगतीकरितां अशा स्वरूपाच्या कामाची आवश्यकता आहे. विज्ञ लोक नसतील तर आवश्यक असें मूलभूत ज्ञान राजकारणी लोकांना मिळणारच नाहीं. सर्वच नागरीक पंडित होऊं शकत नाहींत; त्यांना इतर व्यवसाय असतात. परंतु पंडितांच्या संशोधनाचा लाभ सर्व नागरीक करून घेऊं शकतात, कारण कित्येकांची कामगिरी दुसऱ्या दर्जाच्या लेखकांकडून सारांशानें संश्लिष्ट केली जाते. मूलभूत ज्ञान जड न वाटणाऱ्या रूपांत उपलब्ध करून दिलें जातें, आणि प्रत्येक नागरीक त्याला शक्य होईल तितकें शिकूं शकतो. मुख्यत्वेंकरून, आपल्याला असलेल्या ज्ञानाविषयीं त्यानें विचार करावा. एक ऐतिहासिक वस्तुस्थिति, विशेषतः त्याच्या जाणिवेंत शिरून तेथें दृढ व्हावी : माणसें सुखानें, सुरक्षितपणें व समाधानानें जगत आहेत असें सुवर्णयुग कधींच अस्तित्वांत नव्हतें.

'आपण जेव्हां इतिहास वाचतों, तेव्हां घटना आधींच संकुचित केलेल्या असतात. एका किंवा अनेक शताब्दींची प्रगति एकाद-दुसऱ्याच वाक्यांत सांगितली असण्याची शक्यता आहे. त्यामुळें असें वाटतें, कीं त्या घटनांच्या काळीं जगत असलेल्या माणसांना घडत असलेल्या घटनांचे अर्थ स्पष्टपणें कळत असले पाहिजेत. परंतु असें क्वचितच असतें. सर्वसामान्य नियम असा कीं, केवळ दीर्घ परिप्रेक्षेंतच कोणत्याहि काळाचा तात्पर्यार्थ स्पष्ट होतो. प्रत्येक युगांतच त्या-त्या काळाच्या विशिष्ट समस्या होत्या, धोके होते, आणीबाणीचे क्षणहि होते-हें मूलभूत तथ्य प्रत्येक नागरिकानें पचनी पाडून घेतलें पाहिजे.

'परराष्ट्रीय राजकारण समजून घेण्याचा दुसरा मार्ग भावनिक आहे. हा मार्ग ठांसून भरलेला आहे, कारण ध्येयवादी व्यक्ति या मार्गानेंच गेल्या आहेत. थोडी का होईना संवेदनशीलता असलली कोणतीहि व्यक्ति उपासमारींत परिणत होणारी बुभुक्षा, अविश्वसनीय दारिद्र्य, रोगराई, कष्ट व प्रत्यक्ष जीवनाचीच मानहानि या गोष्टी ध्यानांत न येतां जगाकडे पाहूं शकणार नाहीं. या गोष्टी जगांतील बहुसंख्य लोकसंख्येत विद्यमान् आहेत.

'ज्यांची प्रतिक्रिया प्रामुख्यानें भावनिक आहे अशांना यांच्यावर तडक भाबडा प्रहार करण्याचा मोह होईल. असली भावुकता ही स्वतःपराजयी असते; ज्यांना सहाय्य करण्याचा तिचा मानस आहे, त्यांनाच अपमानित करून ती सुधारणेस पायबंद घालते. असें असलें तरी क्रियेच्या प्रत्येक प्रेरणेचीं मुळें भावनांमध्येंच असतात. जनमतास वळण लावण्याच्या कामीं परिणामकारक होण्याचा प्रयत्न करणाऱ्या नागरिकानें ज्याप्रमाणें ज्ञानसाधना केलीच पाहिजे, त्याचप्रमाणें क्रियेकरितां प्रेरणा त्यानें भावनांमधूनच मिळविली पाहिजे.

परराष्ट्रीय राजकारणाबाबत जनमत तयार करण्याकरितां नागरीक जी तिसरी पद्धत वापरूं शकतो, ती कल्पनाशक्तीच्या वापराची होय. कल्पना करणें म्हणजे स्वप्न पहाण नव्हे; व्याख्येनुसार स्वप्नें हीं












अ-वास्तव असतात. कल्पनाशक्तीला शिस्त लावतां येते व लावली गेली पाहिजे. ज्यांना आपली कल्पनाशक्ति मजबूत करावयाची असेल, त्यांनीं ज्ञानाप्रमाणेंच ध्येयवादाचा-त्याबाबत कांहींतरी करण्याचा-अवलंब केला पाहिजे. ते याहिपेक्षां पुढें जातील; ते हें लक्षांत ठेवतील, कीं परक्या माणसाच्या विचारांची व क्रियांची धाटणी, व त्याचे मूल्यनिर्णयहि, बहुशः त्याला वारसाहक्कानें मिळालेले असतात. कौशल्यानें व धैर्यानें त्यांत बदल घडवून आणतां येतील, परंतु ही प्रक्रिया घाईघाईनें उरकतां येत नाहीं.

' म्हणून कल्पनाशक्तीला शिस्त लावण्यांतील प्रधान घटक धैर्य हा असला पाहिजे. जवळजवळ अपरंपार धैर्य अंगीं बाणविल्यानेंच केवळ पहिल्याच प्रयत्नांना संपूर्ण यश न आल्यानें उद्‌भवणाऱ्या घोर पराजयवादाच्या तावडींतून माणूस सुटूं शकतो. ह्या धैर्याचा अभाव हा वृत्तपत्रकारांचा गुणधर्मच होय; त्यांच्यांत प्रचलित असलेल्या निराशावादाचा खुलासा यामुळें होतो. ते बातम्यांच्या शोधांत असतात, विशेषतः hard बातम्यांच्या - कांहींतरी नाट्यपूर्ण, निर्णायक. औत्क्रांतिक बदलाची धिमी प्रक्रिया त्यांना सामान्यतः दिसतच नाहीं, कारण त्यांची परिप्रेक्षा फार तोकडी असते. त्यांना जरी प्रवाह सांपडला, तरी त्याबद्दल एक ओळहि द्यावीसें त्यांना वाटणार नाहीं कारण त्यांत 'धक्का' नसतो. यामुळें जगांतील बरीचशी खरीखुरी प्रगती वृत्तपत्रांत न येतांच होते.

' शिस्तबद्ध कल्पनाशक्ति असलेल्या व्यक्तीस इवल्याशा प्रगतीबद्दलहि आनंदच होईल-पंडिताला त्यामुळें आश्चर्य वाटेल, व तिच्या धीम्या गतीनें भावुक हताश होईल. अज्ञान, रोगराई, दारिद्र्य, बुभुक्षा हीं साम्राज्यवादाचीं फळें नाहींत, वसाहतवाद वा औद्योगिक क्रांति हींहि त्यांचीं फळें नव्हेत. तीं सर्व माणसाइतकींच जुनीं आहेत आणि सहजपणें व जलदीनें त्यांना हांकलून देतां येणार नाहीं. हा निराशावाद नव्हे; धैर्य धरण्याचें हें समन्स आहे.

कल्पनाशक्तीला शिस्त लावण्याच्या कार्यांत धैर्यानंतर अध्यवसाय येतो. महान् परिणाम हे सुलभ नसतात, हें जसें धैर्यास माहित असतें; त्याचप्रमाणें प्रचंड प्रयत्न सतत जारी असल्याखेरीज थोडी प्रगतीहि थबकेल, हें अध्यवसाय जाणून असतो.

परराष्ट्रीय राजकारणाविषयीं विचार करण्याकरितां स्पष्ट व शिस्तबद्ध कल्पनाशक्ति हें योग्य साधन आहे, ही कल्पना जर मान्य झाली, तर नवीनच स्वतंत्र झालेल्या, पुरातन काळापासून अज्ञानी असलेल्या, अठराविश्वें दारिद्र्य व रोगराई यांचें माहेरघर बनलेल्या राष्ट्रांशीं आपले संबंध कसे असावेत, या प्रश्नाबाबत ही कल्पना कार्यकारी केल्यास काय पदरांत पडतें, तें पहाणें योग्य ठरेल.

' प्रथमतः, क्रांतीच्या निव्वळ उल्लेखानेंच अस्वस्थ होण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे. इतिहासाशीं थोडीशी तोंडओळख असली तरी हें स्पष्ट होईल, कीं क्रांत्या ह्या लिखित इतिहासाच्या वयाच्याच आहेत. आणि ताज्या बातम्या इतक्या आजच्याहि आहेत. शासनसंस्थेंतील कोणताहि बदल मतांच्या सहाय्यानें घडवून आणावा, बंदुकीच्या नव्हे, असें सांगणें फार सोपें आहे; परंतु मानवी अनुभवाच्या क्षेत्रांतील वस्तुस्थितीसमोर ही केवळ एक निष्क्रिय सदिच्छा बनते, शिस्तबद्ध कल्पनाशक्तीनें तिला थारा देतां कामां नये. क्रांतिकारक परिवर्तन ही गोष्ट इतकी सामान्य आहे, कीं तिच्या बाजूनें विपुल वाङ्मय उपलब्ध आहे. आपल्या देशाचा इतिहास जरी आपण चाळला, तरी आज होणाऱ्या क्रांत्या आपण समजून घेऊं शकूं. कारण १७७६ सालीं उजाडलेल्या क्रांतियुगांतच १९६१ सालच्या क्रांत्या मोडतात. ही कल्पना एकदां अंगवळणीं पडली, कीं मग हिंसक राजकीय परिवर्तनाबद्दल शोक करण्याचा मोह राहणार नाहीं. कोणत्याहि देशांतील नवें सरकार समजून घ्यावयाचें झाल्यास एक गोष्ट पक्की पटलेली असली पाहिजे : ती ही, कीं क्रांति ही तत्त्वतः व प्रत्यक्षतः संमत अशी एक सामान्य घटना आहे.

' ध्यानांत घेण्याजोगी दुसरी गोष्ट अशी, कीं नवें सरकार हें अस्थिर असणारच, शासनाबाबत त्या देशांत अटीतटीची स्पर्धा ही असणारच. ह्याचीं कारणेंहि उघडच आहेत. स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळांत ह्या एकाच ध्येयासाठीं सर्व देशभक्त एकत्र येऊं शकतात, व ह्या सर्वांत महत्त्वाच्या उद्दिष्टाकरितां आपले सर्व



अनुक्रमणिका






मतभेद तात्पुरते बाजूला ठेवूं शकतात. जनतेच्या सोयींतील कोणत्याहि प्रकारच्या उणीवांबाबत साम्राज्यवादी राज्यकर्त्यांवर ठपका ठेवतां येतो, करांबाबत दूरच्या राज्यकर्त्यांना दोष देतां येतो आणि बोज्यासारख्या वाटणाऱ्या कोणत्याहि गोष्टीला ' शोषण ' म्हणून मोकळें होतां येतें.

' एकदां स्वातंत्र्य मिळविलें, कीं हें सर्व बदलतें. परक्या शत्रूविरुद्ध लढण्याकरितां एकजूट बांधतां येत नाहीं, दूर राहणाऱ्या कोण्या सैतानाच्या नांवानें खडे फोडतां येत नाहींत. आतां उद्दिष्ट असेल, तें कोणाच्या विरुद्ध जाणारें नसेल, आणि प्रत्येकच माणसाची स्वतःची अशी योजना असूं शकेल. कल्पनाशक्तीच्या विकासाकरितां दुसरा मुद्दा म्हणज क्रांत्युत्तर कालांत त्या देशांतील सरकार अस्थिर असणारच.

' नव्यानें बनलेल्या सरकारच्या बाबतींत तिसरा मुद्दा म्हणजे शास्ते व त्यांचे राजकीय विरोधक यांमधील नातें. क्रांतिकालांतील नियम नेहमींपेक्षां वेगळे असतात; तेथें विरोधी पक्ष हा ' एकनिष्ठ विरोधी पक्ष ' नसतो किंवा निव्वळ राजकीय प्रतिस्पर्धी नसतो, तर तो शत्रूच असतो. पराभूत विरोधक सरकार उलथून पाडण्याचा कट रचीत असण्याची व सैन्यांत फाटाफूट पाडून प्रबळ होऊ पाहण्याची शक्यता असते. अशा परिस्थितींत क्रांतिकारक नेता परराष्ट्रीय वकील व आपले विरोधक यांमधील सामाजिक वा वैयक्तिक संबंध थंडपणें पाहात बसणार नाहीं, हें उघड आहे.

'कल्पनाशक्तीच्या सहाय्यानें क्रांत्यांविषयींचा चौथा एक मुद्दा समजन घेणें सोपें जातें; क्रांति या शब्दांतूनच अभिप्रेत आहे त्याप्रमाणें क्रांति म्हणजे चक्र–परिवर्तन. चक्राला गति दिली कीं निव्वळ अंगच्या भारानें व मिळालेल्या वेगानें तें कांहीं अंतर काटत; आपल्याला हवें तेथें–त्याच बिंदूशीं–तें क्वचितच थांबतें. तसें व्हावयाचें तर परिस्थितीवर अचक नियंत्रण हवें. विशुद्ध अंतःकरणाचे, ध्येयासक्त व लोकशाहीवादी पुढारीसुद्धां चक्र सुरूं करून नंतर तें बरोबर १८० अंश फिरल्यावर थांबवूं शकत नाहींत. त्यांची शक्ति तोकडी पडून चक्र मुळींसुद्धां गति घेत नाहीं, वा ९० अंशांतून फिरल्यावरच थांबतें. एकादें वेळीं चक्र संपूर्णपणें ३६० अंशांचा वळसा घेऊन येतें–ही आणखी एक वेगळीच क्रांति झाली. आरंभींची भावना नेहमींच कांहीं निष्कर्षांवर सत्ता गाजवूं शकत नाहीं. शिवाय यश हें एक नशा आणणारें मद्य आहे.

' क्रांतीचा पांचवा एक पैलू जाणून घेण्यास कल्पनाशक्ति सहाय्य करते : मुद्दा असा, कीं जेते लोक सल्ला मानण्यास तयार नसतात. स्वातंत्र्य मिळवितांना हीं माणसें स्वयंकर्तृत्वशाली होतीं. आजच्या जगांतील कित्येक नेते व जवळजवळ सर्वच क्रांतिकारक यांनीं तुरुंगाची हवा चाखली आहे; व सांप्रत आपण थडग्यांत नसून सत्तेवर आहोंत; या वस्तुस्थितीबद्दल आरामखुर्चींत बसून इतिहासाचें निरीक्षण करणाऱ्या टीकाकाराचें ते कांहींएक देणें लागत नाहींत. विशेषतः वसाहतींतील क्रांतिकारकांना परकीयांबद्दल कृतज्ञता वाटत नाहीं. शिवाय, क्रांतिकारक नेत्यांवरील देशांतर्गत दबाव प्रचड स्वरूपाचा असतो. क्रांतिकरितां लोकांनीं त्याग करावा म्हणून त्यांना एकत्र आणतांना, त्यांनीं–उघडपणें वा सूचकपणें कांहीं वचनें दिलेलीं असतात. महत्त्वाचे बदल घडवून आणल्याखेरीज लोकांवरील प्रभाव कायम ठेवणें शक्य होत नाहीं. जमिनीची लागवड अधिक शहाणपणानें करावी, अंड्यांच उत्पादन वाढविण्याकरितां कोंबड्यांची पैदास चांगली करावी, दुधाकरितां गाईंची निगा राखावी इत्यादि गोष्टी त्या देशाच्या दृष्टीनें प्राथमिक महत्त्वाच्या असल्या तरी अशा कार्यक्रमांना अग्रस्थान दिल जाईलच असें नाहीं, कारण ते पुरेसे नाट्यपूर्ण नसतात व त्यांचें फळ अतिशय सावकाशपणें दिसतें व इकडे लोकांच्या अपेक्षा तर बाजवीपेक्षां फुगलेल्या असतात. क्रांतीच्या एका क्षणांत कांहींतरी महान् व वेगवान् असें सिद्ध केल्यावर मग औत्क्रांतिक प्रक्रिया पक्व होईपर्यंत थांबा, अशा गोष्टी क्रांतिकारक नेता जनतेला सांगू शकत नाहीं. तो गतिमान् क्रियेच प्रतीक असतो, अधिक अंड्यांचें नव्हे. धीमेपणानें जाण्याचा सल्ला तो झिडकारणारच. स्वातंत्र्य, म्हणजे चुका करण्यांचेहि स्वातंत्र्य, हा अर्थ आपण ध्यानीं घेतला पाहिजे.

' नव्या राष्ट्रांच्या विकासाची कामगिरी खासगी भांडवलावर–किंवा–free enterprise वर–सोंपवावी, हा सल्ला कुचकामाचा आहे. कारण ' समाजवाद '

हा त्यांच्याकरितां एक भयावह शब्द नाहीं, उलट त्या बद्दल त्यांना गंभीर आकर्षणच आहे. जगांतील बहुसंख्य राष्ट्रांत आतां समाजवादी सरकारें आहेत–वा होतीं –हें नव्या राष्ट्राच्या नेत्यांना माहित आहे. आपली स्वतःची अर्थव्यवस्था 'मिश्र' आहे, आपल्या आर्थिक जीवनांत सरकारची भूमिका महत्त्वाची आहे, याची जाणीव आपल्यापेक्षां त्यांना अधिक आहे. त्यांनीं क्रांति घडवून आणली, आतां त्यांना अर्थ-व्यवस्थेचें संचालन करावयाचें आहे. खासगी व्यापार व भांडवल यांच्या मागोमाग येणाऱ्या साम्राज्यवादाचा अनुभव त्यांना आलेला आहे. मुक्त बाजारपेठांमार्फत चालणारी दराची सत्ता त्यांना भिववितें, कारण त्यांच्याकडे कच्च्या मालाचें उत्पादन होतें. शिवाय, कित्येक नव्या राष्ट्रांजवळ free enterprise ला आधार देण्याकरितां आवश्यक तें द्रव्यबळ नाहीं. औद्योगिक विकास घडवून आणण्याकरितां लागणारें भांडवल देशांत तर नाहींच. दारिद्य इतकें पराकोटीचें आहे, कीं लक्षावधि दरिद्री प्रजेची उपासमार होऊं दिल्यासच कांहीं शिलकी द्रव्य मिळावें. अशा परिस्थितींत तें राष्ट्र जर totalitarian व्हावयाचें नसेल, तर संपत्ति बाहेरून आली पाहिजे. परंतु नवे नेते इतके हळवे असतात, कीं मदतीबरोबर दिलेला सल्ला जोडलेले कांहीं प्रतिबंधक उपाय त्यांना 'strings' प्रमाणें वाटतात.

'इतिहासाविषयींची प्रत्येक राष्ट्राची दृष्टि वेगवेगळी असते, ही गोष्ट कल्पनाशक्तीनें उमजून घेतलेली बरी, त्यामुळें क्रांतिकारक विश्वांतील वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान सामान्य नागरिकाला होऊं शकेल. राष्ट्रीय दृष्टिकोनानुसार एकाच ऐतिहासिक घटनेचे अर्थ बदलूं शकतात; एकाला ज क्षुल्लक वाटेल, तेंच दुसऱ्याला अतिशय महत्त्वाचें वाटतें. दुसऱ्या दृष्टिकोनांकडे दुर्लक्ष करून आपलें म्हणणें तेवढेंच 'खरें' असा दावा प्रत्येक राष्ट्र करतें. राष्ट्रीय दृष्टिकोनाला ही महत्त्वाची भूमिका देण्याचें राहून गेलें, कीं वर्तमान अडचणींचा लागाबांधा अलीकडेच घडलेल्या घटनांशीं लावला जातो; वस्तुतः अडचणींचीं मुळें खोल परस्परांहून भिन्न अशा इतिहासाच्या संदर्भार्थांत गुंतलेलीं असतात. अशा अडचणी ताबडतोब नाहींशा होणार नाहींत, किंवा आपल्या राजनीतींत बाह्य बदल करून त्यांचें निराकरण करतां येणार नाहीं. दक्षिण अमेरिका, आफ्रिका व आशिया खडांतील कित्येकांना असें वाटतें, कीं आपण (अमेरिकन) कम्युनिझमच्या धोक्यानें ग्रासलों आहोंत. या ग्रस्त होण्याचा समाधानकारक खुलासा आपण (अमेरिकन) करू शकतों. परंतु कित्येक राष्ट्रांच्या ऐतिहासिक परंपरेमुळें त्यांना राजकीय वा आर्थिक साम्राज्यवादाचा धोका अधिक वास्तव वाटतो. कम्युनिस्टापासूनच्या धोक्याचा अनुभव त्यांना नाहीं. ऐतिहासिक दृष्टिकोनांतील हा फरक कल्पनाशक्तीनें एकदां उमजून घेतला, कीं आपल्या इतिहासांत क्षुल्लक भासणारे प्रसंग इतरांच्या इतिहासांत विराट् झालेले आढळून येतात.'

---







प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे

# चार्वाकदर्शन

भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत चार्वाकदर्शनाचें महत्त्व अनन्य आहे यांत संशय नाहीं. डोळ्यावर कोणतीहि झापड बांधून न घेतां चार्वाकांनी शक्य तितकें अचूक, स्पष्ट व दूरवर पाहण्याचा प्रयत्न केला. असें असूनहि चार्वाकदर्शनाचा एकहि मूळ ग्रन्थ आज उपलब्ध नाहीं. जयराशीचा तत्त्वोपप्लवसिंह हा उपलब्ध ग्रन्थ म्हणायला चार्वाकदर्शनाचा आहे. पण चार्वाकतत्त्वज्ञानांतील प्रत्यक्षवादाचा विधायक अंश त्यांत सांपडत नाहीं. सारेंच अप्रमाण आहे, इथून तिथून साराच अन्धार आहे, अशा तऱ्हेचा श्रीहर्षाच्या खण्डनखण्डखाद्यासारखा नुसता विध्वंसक विचारप्रवाह त्यांत आढळून यतो. अशा परिस्थितींत जुने ग्रन्थ तपासून चार्वाकवादाचें मूळ स्वरूप काय होतें तें शक्य तितकें अधिकृतरीत्या निश्चित करण्याचा प्रा. आठवले यांनीं जो प्रयत्न केला आहे तो अभिनन्दनीय आहे. प्रा. आठवले यांनीं हुडकून काढलेल्या अवतरणांच्या आधारें चार्वाकवादाची येथे थोडी चर्चा करण्याचें योजलें आहे.

## प्रत्यक्षमेव प्रमाणम्

प्रत्यक्ष हेंच केवळ प्रमाण आहे हा चार्वाकांचा प्रमुख सिद्धान्त आहे. हा सिद्धान्त मोठा क्रान्तिकारक आहे. कारण अनुमानानें देखील सत्य ज्ञान होतें हें आपण प्रत्यहीं पाहतो. अनुमान हें प्रमाणच नाहीं हें चार्वाकांचें मत सकृद्दर्शनीं इतकें विचित्र वाटतें कीं त्यांतलें मर्म समजणें कठिण होऊन बसलें आहे. चार्वाकाच्या प्रतिपक्षांनीं याचा पुरेपूर फायदा घेतला आहे. " काय म्हणतां अनुमान प्रमाण नाहीं ! प्रत्यक्षाशिवाय ज्ञानच होत नाहीं ! मग प्रवासाला गेल्यावर तुम्ही जिवंत आहांत व आपण विधवा नाहीं हें ज्ञान तुमच्या बायकोला कसें होतें ? " अ हा माझा बाप व इ ही माझी आई हें ज्ञान चार्वाकास प्रत्यक्षानेंच झालें काय ? " अशा तऱ्हेचे बालिश प्रश्न विचारून " जितं मया " म्हणून आस्तिक दार्शनिकांनीं स्वतःची पाठ थोपटून घेतली आहे.

वस्तुतः सगळें ज्ञान मलाच प्रत्यक्षानें झालें पाहिजे असा चार्वाकांचा आग्रह नाहीं. कोणतेंहि ज्ञान कुणालातरी प्रत्यक्षानें झाल्याशिवाय तें खरें मानतां येत नाहीं एवढेंच त्यांचें म्हणणें आहे. प्रवासांत असतांना मी जिवन्त असल्याचें ज्ञान माझ्या बायकोला प्रत्यक्षानें होत नसलें तरी मला प्रत्यक्षानें होतें. तसेंच " ई " ही " च " ची आई आहे हें ज्ञान " च " ला प्रत्यक्षानें होत नसलें तरी " ई " ला प्रत्यक्षानें होतें.

येथें कांहीं वादी चार्वाकावर असा पेच टाकतील कीं " ई " ला अमुक ज्ञान आहे " हें ज्ञान च ला प्रत्यक्षानेंच होतें काय ? जर हें ज्ञान प्रत्यक्षानें होत नसेल तर चार्वाकांच्या मताप्रमाणें ई ला अमुक ज्ञान आहे हें ज्ञानच मुळांत अप्रमाण ठरेल व दुसऱ्यांच्या प्रत्यक्षाच्या आधारें एखाद्या ज्ञानाचा प्रामाण्यनिश्चय करणें अशक्य होईल.

## दुसऱ्यांचें प्रत्यक्ष

या आक्षेपाचें उत्तर ध्यानांत येण्यास हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं अप्रमाण म्हणजे असत्य नव्हे. अप्रमाण म्हणजे असिद्ध, ज्याची सत्यता सिद्ध व्हायची आहे तें. " ई " ला अमुक ज्ञान आहे हें ज्ञान मला प्रत्यक्षानें होत नाहीं असें मानलें तरी असें ज्ञान मला होतें हें नाकबूल करतां येत नाहीं मग तें ज्ञान अप्रमाण कां असेना.

" ई " ला अमुक ज्ञान प्रत्यक्षानें होतें " हें माझें ज्ञानच मुळांत अप्रमाण असलें तरी मी " ई " चें ज्ञान खरें मानतो कारण पूर्वीं अनेक वेळां " ई " ला अमुक ज्ञान प्रत्यक्षानें झालें असें मला वाटलें, तेव्हां तेंच ज्ञान मला देखील कालान्तरानें प्रत्यक्षानें झालें, म्हणजे ईला झालेल्या ज्ञानाची " प्रतीति " मला आली. अग्नीनें हात भाजतो हें ज्ञान ई ला प्रत्यक्षानें झालें असें मला कळलें. कालान्तरानें अग्नीला स्पर्श केल्यावर मलाहि तें ज्ञान प्रत्यक्षानें झालें. " ख " हा चोर आहे हें ज्ञान " ई " ला प्रत्यक्षानें झालें असें मला कळलें. कालान्तरानें " ख " ला चोरी करतांना



अनुक्रमणिका






मी स्वतःच पाहिलें व " ई " ला प्रत्यक्षानें झालेलें ज्ञान मलाहि प्रत्यक्षानें झालें. माझ्या या पूर्वानुभवावरून जें ज्ञान फक्त ईलाच प्रत्यक्षानें होऊं शकतें -- मला प्रत्यक्षानें कधींच होऊं शकत नाहीं -- तें देखील मी खरें मानतों. पण येथे देखील प्रामाण्याचा मूल आधार प्रत्यक्षच आहे हें विसरतां येत नाहीं.

## लोकप्रसिद्ध अनुमान

" ई " चें ज्ञान प्रत्यक्षाच्या कसोटीला उतरतें, " ई " ही माझी आई " हें ई चें ज्ञान आहे, त्याअर्थी तें प्रत्यक्षाच्या कसोटीला उतरण्यासारखें-- म्हणजे खरें आहे " हें अनुमान आहे पण चार्वाकांच्या परिभाषेंत तें " लोकप्रसिद्ध [1] " अनुमान आहे म्हणून असें अनुमान प्रमाण मानण्यास त्यांची हरकत नाहीं. जें अनुमान अनेकवेळां प्रत्यक्षाच्या कसोटीला उतरलें आहे त्याला चार्वाक लोकप्रसिद्ध अनुमान म्हणतात. असें लोकप्रसिद्ध अनुमानच फक्त खरें मानण्याचा चार्वाकांचा दण्डक आधुनिक विज्ञानाच्या पद्धतीशीं तंतोतंत जुळणारा आहे. एखादें अनुमान प्रत्यक्षाच्या कसोटीस उतरल नाहीं तर वैज्ञानिक तें खरें मानीत नाहीं.

अनुमान हें प्रमाणच नाहीं हें चार्वाकांचें मत वाटतें तितकें विचित्र नाहीं हें आतां स्पष्ट होईल असें वाटतें. चार्वाकांचीं बाकीचीं मतें इतकीं उघडपणें खरीं व सहज पटणारीं आहेत कीं त्यामुळेंच तीं " गहन " नाहींत असें अनेकांना वाटतें. श्री. चिं. वि. वैद्य यांच्या-सारख्या विद्वानानें तर चार्वाकवाद लौकिक मतेंच प्रतिपादतो मग त्याला तत्त्वज्ञान कां म्हणावें ? असा एक मनोरंजक प्रश्न उपस्थित केलेला आहे ! तत्त्वज्ञान म्हणजे जें चारचौघांना कधींच खरें वाटूं शकत नाहीं, निदान कळत तरी नाहीं असें कांहींतरी मुलखावेगळें सांगणें हा ग्रह फार सार्वत्रिक आहे. 'सुख हेंच जीवनांतलें एकमेव मूल्य आहे', " प्रत्यक्ष हीच सत्याची कसोटी आहे " वगैरे विधानें इतकी उघड व निर्विवाद वाटतात कीं त्याचमुळें तीं उथळ असावींत असें वाटूं लागतें. गहन तत्त्वें इतकीं सोपीं कशीं असतील ! उलट सुख हें मूल्य नसून निर्गुण निराकार ब्रह्मांत विलीन होणें हेंच निःश्रेयस आहे ", " प्रत्यक्ष दिसणारें जग मिथ्या आहे " वगैरे विधानें इतकीं अगम्य आहेत कीं तीं फार " गहन " असलीं पाहिजेत असा ग्रह होऊन बसतो. कळणाऱ्या व सरळ अर्थीनें हीं विधानें इतकीं धडधडीत खोटीं आहेत कीं या सरळ अर्थामागें कांहींतरी गूढ अर्थ त्यांत भरलेला असला पाहिजे असें वाटूं लागतें.

## अनुमानावर आक्षेप

चार्वाक हे सर्व बाबतींत लोकायत म्हणजे लोक-व्यवहारांत सर्वत्र खरीं मानलीं जाणारीं मतेंच प्रतिपाद-णारे असतांना अनुमानाचें प्रामाण्य नाकारण्यांतच त्यांनीं फक्त लोकव्यवहार कां सोडला, याची थोडी चर्चा केली पाहिजे.

अनुमानाच्या प्रामाण्यावर चार्वाकांचे आक्षेप येणे-प्रमाणें आहेत--

अनुमान व्याप्तीवर अवलंबून असतें. " जिथे जिथे धूम असतो, तिथे तिथे वह्नि असतो " हें धूम व वह्नि यांच्या व्याप्तीचें ज्ञान आहे. या ज्ञानाच्या आधारें धूम दिसला कीं तेथें वह्नि देखील असावा असें आपण अनुमान करतों. पण मुळांत जिथें जिथे धूम आहे तिथे तिथे वह्नि आहे हें ज्ञानच कसें शक्य आहे ? आजपर्यंत पेटलेले सर्व वह्नि व धूम कुणीतरी पाहिले आहेत काय ? आजपर्यंतचे एखाद्या पुराण-पुरुषानें पाहिले असले तरी उद्याचे व परवाचे काय ? आजपर्यंत वह्निशिवाय धूम उद्भवला नाहीं म्हणून पुढें उद्भवणार नाहीं कशावरून [2] ?

यावर कांहीं वादी म्हणतात कीं व्याप्तिज्ञान सामा-न्याच्या द्वारा होतें. जेव्हां आपण धूम पाहतो तेव्हां जगांतल्या सर्व धूमांना साधारण असे धूमत्व नांवाचे गुणधर्म आपल्याला दिसतात. तसेंच जेव्हां आपण वह्नि पाहतो जेव्हां जगांतल्या सर्व वह्नींना साधारण असे वह्नित्व नांवाचे गुणधर्म आपल्याला दिसतात. या साधारण गुणधर्मांनाच सामान्य असें म्हणतात. जेव्हां धूमत्व व वह्नित्व या दोन सामान्य गुणधर्मांच्या

१. लोकप्रसिद्धमनुमानं चार्वाकैरपीष्यते ।

२. न प्रत्यक्षीकृता यावद् धूमाग्निव्यक्तयोऽखिलाः ।
तावत्स्यादपि धूमोऽसौ योऽनग्नेरिति शङ्क्यते ॥







संबंधाचें ज्ञान होतें तेव्हां आपोआपच यच्चयावत् धूम व वह्नि यांच्या संबंधाचें ज्ञान होतें; कारण धूमत्व व वह्नित्व हीं यच्चयावत् धूम व वह्नि यांत अनुस्यूत असतात.

## सामान्य हा काय प्रकार आहे ?

यावर चार्वाकांचें उत्तर असें कीं धूमत्व व वह्नित्व यांच्या नियत संबंधाचें म्हणजेच व्याप्तीचें ज्ञान झाल्यामुळें धूमत्वाच्या आधारें वह्नित्वाचें अनुमान करतां येईल, पण धूमाच्या आधारें वह्नीचें अनुमान करतां येणार नाहीं.[३] धूम व धूमत्व, वह्नि व वह्नित्व यांचा नियत संबंध असल्यामुळें धूमत्व व वह्नित्व यांच्या नियत संबंधाचें ज्ञान झाल्यानें धूम व वह्नि यांच्या नियत संबंधाचें देखील ज्ञान होतें असें म्हणून निभाव लागणार नाहीं. कारण धूम व धूमत्व, वह्नि व वह्नित्व वगरचा नियत संबंध कसा कळणार असा प्रश्न उरतोच. जिथें धूम आहे तिथें वह्नि आहे या ज्ञानाप्रमाणेंच जिथे धूमत्व आहे तिथे धूम आहे हेंहि व्याप्तिज्ञानच आहे. एका व्याप्तिज्ञानानें दुसरें व्याप्तिज्ञान होतें असें समजणें एका आंधळ्यानें मार्गदर्शन केल्यामुळें दुसरा आन्धळा चालूं शकेल अशी अपेक्षा करण्यासारखें आहे. जिथे व्याप्तिज्ञानाचीच उत्पत्ति संशयित आहे तिथे एका व्याप्तिज्ञानाला वाचवण्यासाठीं दुसऱ्या व्याप्तिज्ञानाकडे धाव घेणें तर्कसङ्गत नाहीं

सामान्याचें अस्तित्व मानलें तरी तें व्याप्तिज्ञानाच्या उपयोगी पडत नाहीं. पण चार्वाकांना वरीलप्रमाणें युक्तिवाद करायची गरज वाटत नाहीं कारण ते सामान्याचें अस्तित्वच मुळांत मानत नाहींत [३] सामान्याचें खंडन ते पुढीलप्रमाणें करतात.

सामान्य व्यक्तींहून भिन्न आहे कीं अभिन्न आहे ? धूमत्व व धूम हीं एकच आहेत कीं वेगळीं ? धूम व धमत्व हीं एकच मानलीं तर सामान्य नांवाचा वेगळा पदार्थ मानायला कांहींच आधार उरत नाहीं. बरें धमाहून धूमत्व वेगळें मानलें तर त्यांचा संबंध काय हा प्रश्न उद्भवतो. धूम व धूमत्व यांचा समवाय नांवाचा संबंध आहे असें मानलें तरी हा समवाय एकच आहे कीं प्रत्येक धूमाचा धूमत्वाशीं वेगळा समवाय आहे असा प्रश्न उरतोच. सगळ्या धूमांत एकच समवाय आहे असें मानलें तर समवायालाच सामान्य कां म्हणूं नये ? सामान्याप्रमाणेंच तोहि सर्व धूमांना साधारण व धूमव्यतिरिक्त पदार्थांत न सांपडणारा आहे. बरें प्रत्येक धूमाचा धूमत्वाशीं असलेला समवाय वेगळा आहे असें म्हटलें तर निरनिराळ्या समवायांमध्यें समवायत्व नांवाचें सामान्य आहे असें मानून समवाय व समवायत्व यांना जोडणारा आणखी एक नवा समवाय मानावा लागेल. हा अनवस्थाप्रसंग आहे.

## लक्षणजन्य पदार्थ

कांहीं लोक असें म्हणतील कीं सामान्याची साक्षात् अनुभूति होत असल्यामुळें नुसत्या शाब्दिक युक्तिवादानें तें असिद्ध ठरूं शकत नाहीं. यावर चार्वाक म्हणतात कीं सामान्याची अनुभूति होते हेंच मुळीं खरें नाहीं. एक घट दुसऱ्या घटासारखा दिसतो हें खरें आहे, पण त्यांच्यांत "घटत्व" नांवाचें कांहीं दिसतें असें म्हणणें हा शब्दांचा खेळ आहे. घटांत घटत्व आहे व पटांत पटत्व आहे म्हणून घट पटाहून वेगळा दिसतो असें म्हटलें तर घटत्व पटत्वाहून कां वेगळें दिसतें असा प्रश्न उरतो व घटत्व आणि पटत्व यांत भेद दाखवणारें घटत्वत्व व पटत्वत्व मानावें लागतें !

वस्तुतः सामान्य ही कल्पना धूम, वह्नि वगैरेसारख्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या वस्तूंना बरोबर लागू होत नाहीं. ती रेषा, बिन्दु वगैरे लक्षणजन्य पदार्थांनाच खरी लागू होते. लक्षणजन्य पदार्थ म्हणजे असे असे गुणधर्म असणाऱ्या पदार्थाला अमुक म्हणावें अशा-तऱ्हेच्या सङ्केतानें स्थापित केलेले पदार्थ, मग ते प्रत्यक्षानें दिसोत वा न दिसोत. रेषा म्हणजे रुंदी, उंची, वगैरे परिमाणें नसलेली लांबी, बिन्दु म्हणजे लांबी, रुंदी, उंची वगैरे कोणतेंच परिमाण नसलेलें स्थान. या लक्षणामध्यें बसणारी रेषा वा बिन्दु प्रत्यक्ष दिसतात कीं नाहीं हा प्रश्न या लक्षणजन्य पदार्थांच्या बाबतींत अप्रस्तुत आहे. कागदावर काढलेल्या रेषेला वा बिंदूला हीं लक्षणें लागू होत नसलीं तरी कागदावर खरोखरीच्या रेषा व बिंदु काढतांच येत नाहींत एवढेंच त्यावरून

३. वास्तवं नहि सामान्यं नाम किंचन विद्यते । जिज्ञासूंनीं तत्त्वोपप्लवसिंहांतील सामान्य-खंडन पहावें.



अनुक्रमणिका






ठरतें. हीं लक्षणेंच चूक आहेत असें त्यावरून म्हणतां येत नाहीं. यामुळें सर्व रेषांचा लांबी हा सामान्य धर्म व सर्व बिंदूंचा स्थान हा सामान्य धर्म आहे असें म्हणतां येतें.

## अनुमानकथा कुतः ?

परंतु अशाप्रकारें धूम व वह्नि यांचा कोणताहि सामान्यधर्म दाखवून देतां येत नाहीं. असा कोणता सामान्य धर्म आहे कीं जो सर्व धूमांत राहतो, धूम सोडून कशांतच राहत नाहीं व जो नसला म्हणजे कोणत्याहि वस्तूस धूम ही संज्ञा देतां येत नाहीं ? धूम काळा असतो तसेच ढग देखील काळे असतात. धूम हवेंत तरंगतो तसेच पक्षीहि हवेंत तरंगतात, धूम नाकातोंडांत गेला कीं जीव घाबरतो तसाच अतिप्रमाण उज्जवायु नाकातोंडांत गेला तरी जीव घाबरतो. या सर्व गुणधर्मांमध्यें असा कोणता गुणधर्म आहे कीं जो नाहींसा झाल्यास धूमाचें धूमत्व नाहींसें होईल. धूमावर विशिष्ट रंगाचे प्रकाश टाकल्यानें त्याचा रंग बदलतां येतो. असा रंग बदलल्यानें धूमाचें धूमत्व नष्ट होतें काय ? धूमाचे बाकी सर्व गुणधर्म असून जो हवेंत मात्र उडत नाहीं किंवा नाकातोंडांत गेल्यानें जीव घाबरत नाहीं त्या पदार्थाला धूम म्हणावें कीं नाहीं ? अर्थात् अमुक गुणधर्म म्हणजे धूमाचें धूमत्व असें म्हणतां येत नाहीं. रेषा किंवा बिंदु याप्रमाणें धूमाचें लक्षणच होऊं शकत नाहीं. म्हणून सामान्य ही कल्पना त्याला बरोबर लागू होत नाहीं.

सामान्याची कल्पना व्याप्तीचा बचाव करूं शकत नाहीं व व्याप्ति सिद्ध करण्याचा इतर कोणताहि उपाय नाहीं म्हणून व्याप्तीवर आधारलेलें अनुमान प्रमाण मानतां येत नाहीं, हा चार्वाकांचा सिद्धान्त माझ्या मतें निर्दोष आहे. याच्याविरुद्ध केले गेलेले बहुतेक युक्तिवाद चार्वाकवादाच्या अनाकलनामुळें केले गेले आहेत.

व्याप्ति असिद्ध आहे एवढेंच केवळ नव्हे. व्याप्तिजन्य अनुमान निरर्थक असतें असें देखील म्हणावें लागतें. " या पर्वतावर धूम आहे म्हणून या पर्वतावर वह्नि आहे " हें अनुमान या पर्वतावर वह्नि आहे हें आधीच प्रत्यक्षानें माहित असल्याशिवाय संभवत नाहीं. जें आधींच प्रत्यक्षानें माहित आहे, त्याचें अनुमान करीत राहणें निरर्थक आहे. " या पर्वतावर धूम आहे " एवढेंच फक्त माहित असेल व " या पर्वतावर वह्नि आहे " हें माहित नसेल तर " जिथे जिथे धूम आहे तिथे तिथे वह्नि आहे " हें व्याप्तिज्ञानच अस्तित्वांत नाहीं असें म्हणावें लागेल. मग त्याच्या आधारें अनुमान कसें होणार ? हाच भाव पुढील कारिकेंत व्यक्त झाला आहे.

> विशेषेऽनुगमाभावः सामान्ये सिद्धसाध्यता ।
> अनुमानभङ्गपङ्केऽस्मिन् निमग्ना वादिदन्तिनः ॥

अनुमानानें पूर्वी प्रत्यक्षानें न झालेलें कांहीं विशेष ज्ञान होत असेल तर अनुमान असिद्ध आहे, आणि पूर्वी प्रत्यक्षानें झालेलेंच ज्ञान होत असेल तर तें निरर्थक आहे. पाश्चात्य तार्किकांत मिल्नें संवाक्या ( syllogism ) विरुद्ध जो युक्तिवाद केला आहे त्याचाहि मथितार्थ हाच आहे.

## शुद्ध अनुमानें

व्याप्तिजन्य अनुमान असिद्ध असलें तरी सारीं अनुमानें असिद्ध असतात असें नाहीं. गणितांतील अनुमानें व्याप्तिजन्य नसतात. " माझ्याजवळ ४ रुपये होते, त्यांतले २ मी खर्च केले आणि १ रुपया हरवला. तेव्हां माझ्याजवळ आतां एकच रुपया उरला असेल " हें अनुमान व्याप्तिजन्य नाहीं. इथे १ रुपया वाचला हें निगमन आहे. या निगमनाचा आधार ( १ ) माझ्याजवळ ४ रुपये होते, ( २ ) त्यांतले दोन खर्च झाले व ( ३ ) एक रुपया हरवला हीं तीन वाक्यें आहेत. या तीन वाक्यापैकीं कोणतेंहि वाक्य व्याप्तिरूप नाहीं. " चारांतून तीन काढल्यानें एक उरतो " या व्याप्तिवर हें अनुमान आधारलेलें आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. गणिताच्या भाषेंत हें अनुमान मांडल्याबरोबर स्पष्ट होईल. ४–३=१ या निगमनाचा आधार चारांतून तीन काढल्यानें एक उरतो हें वाक्य आहे असें म्हणणें ४ – ३ = १ या निगमनाचा आधार ४ – १ = ३ ही व्याप्ति आहे असें म्हणण्यासारखेंच आहे ! अशानें निगमन व व्याप्ति एकरूपच ठरते. अर्जुनाचा बाप धनंजय असाच हा न्याय झाला. तेव्हां आकडेमोड हें व्याप्तिजन्य अनुमान नाहीं हें स्पष्ट आहे.

गणिताच्या अनुमानाप्रमाणेच इतरहि कांहीं अनुमानें व्याप्तिविरहित असतात. जसें " हिमालय लङ्केच्या उत्तरेस आहे ∴ लङ्का हिमालयाच्या दक्षिणेस आहे " हें अनुमान व्याप्तिजन्य नाहीं. " लङ्का हिमालयाच्या दक्षिणेस आहे " या निगमनाला आधारभूत म्हणण्यासारखी " जिथे जिथे अमुक आहे तिथे तिथे दक्षिणत्व आहे " या प्रकारची कोणतीच व्याप्ति नाहीं. हिमालय लङ्केच्या उत्तरेस आहे. कारण लङ्का हिमालयाच्या दक्षिणेस आहे असें अनुमान करतां येतें. कारण " अ " " ब " च्या उत्तरेस आहे या वाक्यांत " ब " " अ " च्या दक्षिणेस आहे हें वाक्य गर्भित आहे. परंतु "अ " धूमवान् आहे या वाक्यांत अ वह्निमान् आहे हें वाक्य गर्भित नाहीं. जोपर्यंत जिथे जिथे धूम आहे तिथे तिथे वह्नि आहे ही व्याप्ति सिद्ध होत नाहीं तोंपर्यंत या दोन वाक्यांचा सम्बन्ध स्थापित होत नाहीं.

## चार्वाकांचीं अनुमानें

सारींच अनुमानें असिद्ध मानलीं तर चार्वाकांचे अनुमानाविरुद्धचे युक्तिवाद देखील असिद्ध ठरतील, कारण हे युक्तिवादहि अनुमानरूपच आहेत. हे युक्तिवाद असिद्ध नाहींत कारण ते व्याप्तिजन्य अनुमानासारखे नाहींत. " या पर्वतावर वह्नि आहे कारण त्यावर धूम आहे " हें अनुमान असिद्ध ठरवतांना चार्वाक पुढील युक्तिवाद करतात.

या धूमाचें मला ज्ञान नाहीं.

∴ हा धूम वह्निमान् आहे कीं नाहीं याचें मला ज्ञान नाहीं.

या अनुमानांतील पहिलें वाक्य व्याप्तीच्या स्वरूपाचें नाहीं. या धूमाचें मला ज्ञान नाहीं हें विधान मला शिंग नाहीं या विधानासारखेंच प्रत्यक्षसिद्ध आहे. या प्रत्यक्षसिद्ध विधानावर आधारलेलें " मला हा धूम वह्निमान् आहे कीं नाहीं हें माहीत नाहीं " हें निगमनदेखील व्याप्तीवर आधारलेलें नसून गर्भिततेवर आधारलेलें आहे. हिमालय लङ्केच्या उत्तरेस आहे. या वाक्यांत लङ्का हिमालयाच्या दक्षिणेस आहे हें वाक्य जसें गर्भित आहे, किंवा " ई " ही पेटी नाहीं " या वाक्यांत " ई ही लाल पेटी नाहीं " हें वाक्य जसें गर्भित आहे तसेंच " हा धूम ज्ञात नाहीं" या वाक्यांत " या धूमाचें वह्निमत्त्व ज्ञात नाहीं " हें वाक्य गर्भित आहे. चार्वाकांचीं अनुमानविरोधी अनुमानें याप्रमाणें प्रत्यक्षजन्य व्याप्तीवर आधारलेलीं नसून गर्भिततेवर आधारलेलीं असल्यामुळें तीं असिद्ध नाहींत.

चार्वाकांनीं फक्त प्रत्यक्षजन्य व्याप्तीवर आधारलेल्या अनुमानाचें खण्डन केलें आहे. साऱ्याच अनुमानाचें खण्डन केलें नाहीं. मग फक्त प्रत्यक्षच प्रमाण आहे असा त्यांचा आग्रह कां ? चार्वाकांना ज्यांचें खण्डन करतां येणार नाहीं अशीं हीं दुसरीं अनुमानें प्रमाण कां मानूं नयेत ?

## शुद्ध अनुमानानें ज्ञान होत नाहीं

यावर असें उत्तर देतां येईल कीं सारींच अनुमानें असिद्ध नसलीं तरी अनुमानाच्या साहाय्यानें सत्यसृष्टीचें ज्ञान होऊं शकत नाहीं. चार्वाकांच्या अनुमानविरोधी अनुमानानें " या पर्वतावर वह्नि आहे " हें निगमन असिद्ध आहे एवढेंच कळतें. पण असिद्ध म्हणजे खोटें नव्हे. या पर्वतावर वह्नि आहे कीं नाहीं हें या अनुमानविरोधी अनुमानानें कळत नाहीं. माझ्याजवळ चार रुपये असले व त्यांतले दोन हरवले तर माझ्याजवळ दोन उरतील हें गणिताचें अनुमान चार्वाकांच्या अनुमानविरोधी अनुमानाप्रमाणेंच बरोबर असलें, तरी माझ्याजवळ चार रुपये होते कीं नाहीं व त्यांतले दोन हरवले कीं नाहीं हें प्रत्यक्षाशिवाय कळूं शकत नाहीं.

माझ्याजवळ चार रुपये होते व त्यांतले दोन हरवले हीं दोन ज्ञानें मला प्रत्यक्षाशिवाय होऊं शकत नसतील पण हीं ज्ञानें झाल्यावर " म्हणून माझ्याजवळ दोन रुपये उरले " हें ज्ञान मला अनुमानानेंच होतें कीं नाहीं ? असें यावर कुणी विचारील, त्याला चार्वाकांच्या तर्फे असें उत्तर देतां येईल कीं माझ्याजवळ ४−२ रुपये आहेत या प्रत्यक्षसिद्ध ज्ञानापेक्षां माझ्याजवळ दोन रुपये आहेत " हें अनुमानसिद्ध ज्ञान काहीं वेगळें आहे असें म्हणतां येत नाहीं. तें वेगळ्या शब्दांत मांडलें आहे एवढेंच. प्रत्यक्षानें झालेलें ज्ञान, अनुमानाच्या साहाय्यानें वेगळ्या शब्दांत मांडून दाखवतां येईल. पण यावरून प्रत्यक्षाला न होणारें असें कांहीं ज्ञान अनुमानाला होतें असें म्हणतां येणार नाहीं.

## विज्ञानाचा प्रत्यक्षवाद

" प्रत्यक्षमेव प्रमाणम् " असें मानल्यावर अनुमानानें झालेलें ज्ञान प्रत्यक्षाच्या कसोटीस उतरतें कीं नाहीं हें पाहिल्याशिवाय त्याचें प्रामाण्य निश्चित होऊं शकत नाहीं. " धूर तिथें विस्तव ", " अग्नीनें पाणी तापतें " वगैरे ज्ञान चार्वाक प्रमाण मानायला तयार आहेत कारण तें प्रत्यक्षाच्या कसोटीला उतरतें. एखाद्या दिवशीं " विस्तवाशिवाय धूर दिसला व चुलीवर ठेवलेलें पाणी देखील गार लागलें तर चार्वाक हें देखील ज्ञान अप्रमाण मानतील. चार्वाकांच्या भाषेंत प्रत्यक्षाच्या कसोटीस उतरणारीं वरील अनुमानें " लोकप्रसिद्ध " अनुमानें होत.

भौतिकीचे विद्युदणु प्रत्यक्षगोचर नसतात, मग चार्वाकांच्या मतें ते नाहींत असेंच समजावें काय असा एक प्रश्न नेहमीं विचारण्यांत येतो. याचें उत्तर उपपन्नप्रतीति व उत्पाद्यप्रतीति या चार्वाकांनीं मानलेल्या अनुमानाच्या दोन भेदांमध्यें सांपडतें. उपपन्नप्रतीति म्हणजे ज्याची सत्यता प्रत्यक्षानें कळली आहे तें व उत्पाद्यप्रतीति म्हणजे ज्याची सत्यता अशाप्रकारें कळलेली नाहीं तें. येथें प्रतीति हा शब्द महत्त्वाचा आहे. आधुनिक तार्किक प्रत्यक्षवादानें वापरलेल्या verification या शब्दांतील अर्थ प्रतीति या शब्दानें व्यक्त होतो. विद्युदणु स्वतःच डोळ्यांना दिसत नसले तरी प्रयोगशाळेंत त्यांचें अस्तित्व प्रत्यक्षानें " प्रतीत " होतें.

आधुनिक विज्ञानांतील परमाणूंची रचना अतीन्द्रिय कशी नाहीं याबद्दल रसेलचीं खालील विधानें मनन करण्यासारखीं आहेत. " The newer theory ... describes the atom by means of radiations that come out of it. This newer theory confines itself to what is *empirically* verifiable, namely radiations; as to what there is where the radiations come from ... it is scientifically unnecessary to speculate."

अर्थात् परमाणूंचें वर्णन प्रत्यक्षगोचर अशा विकिरणांच्या साहाय्यानेंच केलें जातें. त्यामुळें जें प्रत्यक्षगोचर नाहीं तें असिद्ध समजावें या चार्वाकांच्या सिद्धान्ताविरुद्ध परमाणूंच्या घटनेचें उदाहरण गैरलागू आहे.

## हेंहि प्रत्यक्षनिष्ठच आहे

आधुनिक विज्ञानांतील अतीन्द्रियशीं वाटणारीं तत्त्वें वस्तुतः अतीन्द्रिय कशीं नसतात याचें उदाहरण म्हणून सांख्यिकींतील सरासरी, पल्ला–म्हणजे किमान व कमाल यामधील अन्तर– वगैरे कल्पनांचें उदाहरण देतां येईल. एखाद्या देशांत दर कुटुम्बाला सरासरी साडेतीन मुलें पडत असतील. साडेतीन मुलांचं कुटुंब प्रत्यक्ष दिसूं शकत नाहीं. तरीदेखील सरासरी हें ईश्वरासारखें एखादें अतीन्द्रिय तत्त्व आहे असें कोणी म्हणत नाहीं. कारण सरासरी कुटुम्ब प्रत्यक्षगोचर नसलें तरी ज्या कुटुंबांच्या आधारें सरासरी काढण्यांत येते तीं सारीं कुटुंबें प्रत्यक्षगोचर असतात. सरासरी कुटुंब या कल्पनेची व्याख्या प्रत्यक्षगोचर कुटुंबांच्या आधारेंच करण्यांत येते व एखाद्या देशांतील सरासरी कुटुंब साडेतीन मुलांचें आहे कीं नाहीं याचा पडताळा प्रत्यक्षाच्या आधारेंच पाहतां येतो. ईश्वराचें तसें नाहीं. ईश्वराची व्याख्या प्रत्यक्षगोचर वस्तूच्या आधारें करतां येत नाहीं व ईश्वर आहे कीं नाहीं याचा पडताळा प्रत्यक्षाच्या आधारें पाहतां येत नाहीं.

चार्वाक फक्त प्रत्यक्षसिद्ध तत्त्वेंच खरीं मानतात. म्हणून शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे इंद्रियांना गोचर होणारे गुण व त्यांचीं आश्रयभूत पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें, या व्यतिरिक्त कोणतेहि पदार्थ त्यांना मानतां येत नाहींत. पण चार्वाकांना देखील सुख व दुःख यांचें अस्तित्व मानावेंच लागतें. सुखदुःखांचा अनुभव ज्ञानेन्द्रियांनीं येत नाहीं. म्हणून प्रत्यक्ष म्हणजे केवळ ज्ञानेन्द्रियांना येणारे अनुभव एवढाच अर्थ चार्वाकांना अभिप्रेत नसावा. अव्यवहित अनुभव (direct experience) म्हणजे प्रत्यक्ष असें प्रत्यक्षाचें लक्षण केल्यानें तत्त्वांची व्याप्ति केवळ पंचमहाभूतापुरतीच मर्यादित राहात नाहीं. या व्यतिरिक्त भार, तोल, शीतोष्ण वगैरेंचा अनुभव देखील अव्यवहित रूपानें होतो. शीतोष्णज्ञानाचा अन्तर्भाव स्पर्शज्ञानांत होत नाहीं कारण जो पदार्थ शीतहि नाहीं व उष्णहि नाहीं त्याचें देखील स्पर्शानें ज्ञान होऊं शकतें. शिवाय हिंवतापाची थण्डी किंवा ज्वराची गरमी त्वचेला कशाचा तरी स्पर्श झाल्यासारखी भासत नाहीं. प्रत्यक्षाची व्याप्ति, सुखदुःखासारख्या अव्यवहित अनुभवापर्यंत वाढवल्या








प्रत्यक्षवाद, भौतिकवादाहून वेगळा ठरतो, कारण मग त्याला पंचमहाभूताव्यतिरिक्त इतर अनेक तत्त्वें मानावीं लागतात.

पण पंचमहाभूताव्यतिरिक्त पदार्थ मानणें म्हणजे देहाव्यतिरिक्त अमर आत्मा, वगैरेंना मान्यता देणें नव्हे. सुखदुःखादि अनुभव हे ज्ञानेन्द्रियांचे अनुभव नसले तरी भौतिक शरीरावांचून ते सम्भवतात असें म्हणतां येत नाहीं.

## ऐहिकवाद आणि स्वभाववाद

सारांश प्रत्यक्षाची व्याप्ति वाढवली व शुद्ध गणितांतील अनुमानें, लोकप्रसिद्ध अनुमानें, वगैरे अनुमानें देखील प्रमाण मानलीं तरी चार्वाकांचा देहात्मवाद अचलच राहतो. कारण (१) आत्म्याचें अमरत्व अनुभवानें सिद्ध होत नाहीं. शीतोष्ण, सुखदुःख वगैरेंचें जसें अव्यवहित ज्ञान होतें तसें आत्म्याच्या अमरत्वाचें ज्ञान होत नाहीं. (२) आत्म्याचें अमरत्व सिद्ध करणारें एकहि हेत्वाभासरहित अनुमान उपलब्ध नाहीं.

आत्म्याच्या अमरत्वाप्रमाणेंच ईश्वर, परलोक, वगैरेंचीहि स्थिति आहे. यांचें ज्ञान प्रत्यक्षानें होत नाहीं तसेंच कोणत्याहि गणिती वा लोकप्रसिद्ध अनुमानाचा त्यांना आधार नाहीं.

चार्वाकांनीं भौतिकवाद किंवा अधिक व्यापक दृष्ट्या ऐहिकवाद उचलून धरला, त्याचप्रमाणें ऐहिक सृष्टिक्रमाची उपपत्ति लावण्यासाठीं त्यांनीं स्वभाववाद उचलून धरला. सृष्टिक्रमाची उपपत्ति अमुक असें कां व कसें होतें या प्रश्नाचें उत्तर दिल्यानें लागते. हिंवताप कसा होतो ? हिंवतापाचे जंतु रक्तांत भिनल्यानें ते जंतु रक्तांत कसे भिनतात ? डास चावल्यानें. डास कसे होतात ? डबक्यांत पाणी साचल्यानें. अशा तऱ्हेचीं उत्तरें विज्ञान शोधून काढतें. हा शोध म्हणजे कारणांचा शोध असतो. कारणमीमांसा म्हणजे कार्याच्या पूर्वी काय घडतें हा नियम शोधून काढणें.

सृष्टिक्रमाची उपपत्ति लावतांना विज्ञान नेहमीं पूर्वी काय घडतें याचाच नियम शोधून काढतें असें नाहीं. कधी कधी वैज्ञानिक घडणारी घटना एकांडी नसून कोणत्यातरी व्यापक नियमांत बसते हें दाखवून त्या घटनेची उपपत्ति लावतात. “ देठ तुटलेलें फळ झाडावरून खालीं कां पडतें ? ” याचें उत्तर म्हणून विज्ञान सांगतें कीं नुसतें फळच पृथ्वीवर पडतें असें नाहीं तर कोणताहि पदार्थ दुसऱ्या पदार्थाला त्याच्यामध्ये असलेल्या अन्तराशीं व्यस्त प्रमाणांत व स्वतःच्या द्रव्यमानाशीं समप्रमाणांत असलेल्या शक्तीनें ओढतो. फळ पृथ्वीवर पडणें हें याच नियमाचें एक उदाहरण आहे.

सारांश विज्ञानाच्या दृष्टीनें कोणत्याहि घटनेची उपपत्ति लावणें म्हणजे तिच्याबद्दलचे नियम शोधून काढणें. यालाच स्वभाववाद म्हणतात. कारण कोणतीहि घटना अशी कां घडते याला सृष्टीचा तसाच नियम आहे, किंवा त्या घटनांचा तसा स्वभावच आहे या व्यतिरिक्त कोणतेंहि उत्तर देतां येत नाहीं. अग्नि उष्ण व पाणी थंड कां तर उष्णता हा अग्नीचा व थंडपणा हा पाण्याचा स्वभाव आहे म्हणून. सृष्टींत तसेंच सर्वत्र दिसतें म्हणून.

## हेतुवादाची निरर्थकता

पण या स्वभाववादावर कांहीं लोकांचें समाधान होत नाहीं. अमुक घटना अशी कां घडते याचें खरें उत्तर त्या घटनेच्या मागचा हेतु सांगितल्याशिवाय देतां येत नाहीं असें त्यांना वाटतें. मी अभ्यास कां करतो ? तर मला पास व्हायचें आहे म्हणून. मडक्याच्या बुडाशीं भोक कां नसतें ? तर मडकें पाणी साचवण्यासाठीं घडवलेलें असतें म्हणून. कोणत्याहि घटनेची उपपत्ति अशा हेतुमीमांसेशिवाय लागत नाहीं; म्हणून सृष्टींतील घटनांची उपपत्ति लावायची असेल तर त्या घटनांच्या मागचा हेतु शोधला पाहिजे. नुसतें ती घटना अमुक नियमांत बसते असें सांगून उपयोग नाहीं.

या हेतुवादावर कोणताहि सुबुद्ध मनुष्य असा आक्षेप घेईल कीं अभ्यास, मडकीं घडवणें वगैरे मानवानें बुद्धिपुरःसर केलेल्या व्यापारांच्या बाबतींत अमुक घटनेच्या मागचा हेतु काय हें विचारण्यांत अर्थ असला तरी सोडलेलें फळ खालीं पडणें, हिंवताप वगैरे घटनांच्या मागें काय हेतु आहे असें विचारण्यांत कांहींच अर्थ नाहीं, कारण या घटना कुणीतरी बुद्धिपुरःसर घडवून आणल्या आहेत असें समजण्यास कांहींच आधार नाहीं.

शिवाय हेतु सांगितल्यानें सृष्टिक्रमाची अन्तिम उपपत्ति लागते असें समजणेंहि चूक आहे. सोडलेलें

४. अग्निरुष्णः, जलं शीतं इति स्वभावाद् व्यवस्थितिः ।








फळ जमिनीवर पडतें कारण ईश्वराची तशी इच्छा आहे, हिंवताप होतो कारण ईश्वर त्या मार्गानें पापाबद्दल प्रायश्चित्त देतो असें म्हटलें तरी, ईश्वराच्या मनांत सोडलेलें फळ जमिनीवर पडावें अशीच कां इच्छा होते, आजकालच्या अग्निबाणाप्रमाणें हवेंत उडावें अशी कां इच्छा होत नाहीं, ईश्वर पाप्याला प्रायश्चित्तच कां देतो, बक्षीस कां देत नाहीं असे प्रश्न उरतातच. अशा प्रश्नांचें उत्तर देतांना ईश्वराचा स्वभावच तसा आहे असेंच उत्तर ईश्वरवादी देणार ना ! म्हणजे स्वभाववाद आलाच !! ईश्वर न्यायी आहे म्हणून तो पापाला प्रायश्चित्त व पुण्याला बक्षीस देतो असें म्हणणें काय व पापाला प्रायश्चित व पुण्याला बक्षीस देणें हा ईश्वराचा स्वभाव आहे असें म्हणणें काय सारखेंच. ज्याच्या अस्तित्वाबद्दल कांहींच प्रमाण नाहीं असा ईश्वर आधी कल्पून मग त्याच्या करणीची उपपत्ति लावण्यासाठीं स्वभाववादाकडे धाव घेण्यापेक्षां, सृष्टिक्रमाचीच उपपत्ति स्वभाववादाच्या आधारें कां लावूं नये !

## बिचारे पुरोहित

चार्वाकांनीं ईश्वर, परलोक वगैरे कल्पनाबद्दल प्रतिपादलेलीं मतें या प्रकारें रास्त समजण्यास हरकत नाहीं. पण या कल्पनांवर जगणाऱ्या पुरोहितवर्गाची निन्दा करण्यांत मात्र ते घसरले आहेत असें निःपक्षपाती विवेचकाला म्हणावें लागतें. ईश्वर, परलोक वगैरे कल्पना पुरोहितांनीं लोकांना फसवून आपलें पोट भरण्यासाठीं निर्माण केल्या आहेत अशा अर्थाचीं चार्वाकांचीं वचनें वाचलीं म्हणजे शोषक म्हणून पुरोहितांची निंदा करणाऱ्या मार्क्सवाद्यांची आठवण होते. पुरोहितांची अशाप्रकारें निंदा करणें हा आजकाल "पुरोगामी" पणा समजला जातो व आपल्याला पुरोगामी हें लेबल लागावें या हव्यासापायीं अनेक विवेचक सत्याचा बिनदिक्कत खून करायला तयार असतात.

पुरोहितांवरील फसवेगिरीचा आरोप अन्यायाचा आहे. हा आरोप करतांना ईश्वर, परलोक वगैरे कल्पनांवर पुरोहितांचा स्वतःचाच विश्वास नव्हता असें सिद्ध करण्याची जबाबदारी त्यांच्या निंदकावर येऊन पडते. दुसरें असें कीं मूठभर पुरोहित चार्वाकांचा वा मार्क्सवाद्यांचा उदय होईपर्यंत बहुसंख्य समाजाला शतकानुशतकें फसवीत आले असें म्हणणें पुरोहित हेच केवळ बुद्धिमत्तेचे खंदक होते व बाकीचा सारा समाज बोळ्यानें दूध पीत होता असें म्हणण्यासारखें आहे. समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या बुद्धिमत्तेंत तरुण व अजाण मूल, किंवा सर्कसवाला व त्याच्या इशाऱ्यावर नाचणारे प्राणी यांच्याइतका फरक असूं शकत नाहीं हें सांगायला कसलेल्या मानसशास्त्रज्ञाची जरूर नाहीं. ईश्वर, परलोक वगैरे कल्पना जगांतल्या सर्व समाजांतच प्रभावी होत्या. आजदेखील विज्ञानाची एवढी वाढ झाली असतांना या कल्पनांवर विश्वास ठेवणारे अनेक वैज्ञानिक आढळतात. तेव्हां परलोकजीवी भिक्षुकांचा स्वतःच परलोकावर विश्वास होता असें समजणेंच न्यायाचें आहे.

## अदलाबदल करूं या

पुरोहित वा भिक्षुक हे इतर कोणत्याहि वर्गाइतकेच प्रामाणिक होते हें एकदां मानलें कीं पेनिसिलीन दिल्यानें वाटेल तो संसर्गदोष नाहींसा होतो या समजुतीनें सर्रास पेनिसिलीनचा वापर करीत सुटणाऱ्या डॉक्टरवर शोषणाचा आरोप जितपत लागू होईल तितपतच तो पुरोहितवर्गावर लागू होतो. पुरोहित हे समाजाची एक गरज भागवीत होते आम्हाला श्राद्धाला बोलवा म्हणून ते समाजावर जबरदस्ती करीत नव्हते. श्राद्धाला ब्राह्मण बोलवावे अशी ज्यांची श्रद्धा होती तेच ब्राह्मणांना बोलवीत व आपल्या श्रद्धेचें समाधान करून घेत. या सरळ देवघेवीच्या प्रकाराला शोषण म्हटलें तर कोणताहि व्यवसाय या आरोपांतून सुटूं शकणार नाहीं.

शतकानुशतकें समाजाचें शोषण केल्याचा आरोप ज्यांच्यावर करण्यांत येतो त्या भिक्षुकांनीं इतकें शोषण करून किती धन मिळवलें याची मोजदाद करूं लागलें म्हणजे या आरोपाचा अन्याय अधिकच खुपूं लागतो. भिक्षुकवर्ग हा कोणत्याहि काळीं मोठा संपन्न असल्याचें दाखवून देतां येणार नाहीं. पांच हजार रुपये पगार मिळवणारे माझे एक मित्र शोषक म्हणून नेहमीं भिक्षुकवर्गावर दातओठ खात असतात. मी एकदां त्यांना म्हटलें "रावसाहेब तुम्ही आपला सर्व पगार जर गांवांतल्या भिक्षुकांना वाटायला तयार असाल तर












या गांवांतल्या भिक्षुकांना मिळणारी सर्व दक्षिणा मी तुम्हाला द्यायला तयार आहे. आहे कबूल ?" रावसाहेब कबूल झाले नाहींत हें सागणें नकोच. भिक्षुकांची मिळकत इतकी अल्प असते कीं त्यांनीं समाजाची कोणतीच गरज भागवली नाहीं तरी तिचें कोणाला वैषम्य वाटूं नये. असें असतां सतत त्यांच्या दक्षिणेचा उल्लेख करून त्यांच्या नांवानें खडे फोडण्यांत पन्थबाज पूर्वग्रहाशिवाय काय अधिक अर्थ आहे ?

## चार्वाकांचें नीतिशास्त्र

चार्वाकांची सगळ्यांत जास्त बदनामी "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" "कर्ज काढा आणि तूप झोडा" या त्यांच्या नांवावर खपणाऱ्या वाक्यानें झाली आहे. वादच करायचा झाला तर चार्वाकांनीं फक्त कर्ज काढायला सांगितलें, काढलेलें कर्ज परत करूं नका असें सांगितलें नाहीं. तेव्हां या वाक्यांत एवढें निंद्य काय आहे ? असें विचारतां येईल. व्यापारी लाखो रुपयांचे व्यवहार उधारीवर करतात. तें सज्जन नसतात असे सांप्रदायिक अंधश्रद्धांनीं न पछाडलेला कोणताहि सुबुद्ध मनुष्य म्हणणार नाहीं.

पण सुदैवानें वरील वाक्याच्या बाबतींत चार्वाकाचें समर्थन करण्याची जरूर उरलेली नाहीं. प्रा. आठवले यांनीं "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" हें वाक्य प्रक्षिप्त आहे, त्याच्या जागीं "नास्ति मृत्योरगोचरः" म्हणजे मृत्यूची ज्यावर मात्रा चालत नाहीं असा कुणींच नाहीं, असें वाक्य होतें हें सप्रमाण दाखवून दिलें आहे.

"ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" हें कुप्रसिद्ध वचन सोडलें तर "यावज्जीवेत् सुखं जीवेत्" या चार्वाकांच्या उपदेशांत गैर काहींच नाही. मिल्, बेंथॅम, स्पेंसर वगैरे तत्त्वज्ञांनीं तर सुख हेंच जीविताचें एकमेव ध्येय आहे हें सिद्ध करून दाखवलें आहे. या सुखवादावर नेहमीं घेण्यांत येणारे बहुतेक आक्षेप शाब्दिक आहेत. सुख या शब्दाची व्याप्ति फक्त भोजन व मैथुन यापुरतीच मर्यादित न ठेवतां जें जें "अनुकूलतया वेदनीय" तें तें सर्व सुख असें म्हटलें म्हणजे यापैकीं पुष्कळसे आक्षेप आपोआपच गळून पडतात.

पाश्चात्य सुखवाद्यांप्रमाणेंच चार्वाकदेखील बहुजन सुखाय प्रवृत्त झाले होते हें निर्विवाद आहे. "बहूनां प्राणिनामनुग्रहार्थं" अशीच चार्वाकांची प्रतिज्ञा होती. त्यांच्या प्रामाणिक बुद्धिवादामुळें, स्त्रियांनीं एकाच पुरुषाशीं निष्ठा ठेवून तो मेल्यावर सती जावें. पुरुषानें मात्र कुणाहि स्त्रीवर निष्ठा न ठेवतां केवळ भोगाचें साधन म्हणून अनेकींशी संबंध ठेवावे[५], बुद्धि वा शरीर यांत कोणताहि प्रत्यक्षसिद्ध भेद नसतांना एक व्यक्ति उच्च वर्णाची व दुसरी नीच वर्णाची समजावी[६] या प्रकारांतील अन्याय त्यांना सहज दिसला व त्यांनीं त्याला वाचा फोडली.

चार्वाक वैयक्तिक स्वार्थासाठीं जग बुडवावें असा उपदेश करीत होते. समाजधारणा शक्य होण्यासाठीं वैयक्तिक स्वार्थाला मर्यादा घालाव्याच लागतात हें साधें सत्यदेखील त्यांना कळलें नाहीं असा आरोप करणाऱ्या लोकांना ईश्वर, परलोक, आत्मा वगैरे कल्पनांशिवाय समाजधारणा शक्य नाहीं असें वाटत असतें. वस्तुतः या कल्पनांचा नीति-अनीतीशीं कांहींच संबंध नाहीं. आत्मा अमर असेल तर चोरी करणें वाईट व विनाशी असेल तर चोरी करणें चांगलें; या लोकाव्यतिरिक्त दुसरा एखादा लोक अस्तित्वांत असेल तर खोटें बोलणें वाईट व या लोकाव्यतिरिक्त अस्तित्व शक्य नसेल तर खोटें बोलणें चांगलें, ईश्वर अस्तित्वांत नसेल तर व्यभिचार करायला हरकत नाहीं, असेल तर मात्र व्यभिचार हें पाप ठरेल हें तर्कशास्त्र अजब आहे.

## विज्ञानभूत नीतिशास्त्र

या तर्कशास्त्राच्या मुळाशीं अशी कल्पना असते कीं आत्मा अमर असल्यास या जन्मीं केलेल्या चोरीचा पुढील जन्मीं जाब द्यावा लागेल, तो देहाबरोबर नष्ट होत असल्यास, या जन्मीं चोरी पचल्यास कायमचीच पचेल, परलोक असेल तर या लोकीं खोटें बोलल्यानें परलोकीं नरकांत जावें लागेल, परलोक नसेलच तर या लोकींचा खोटेपणा उघडकीस येणार नाहीं याची काळजी घेतली कीं पुरे. ईश्वर असेल तर व्यभिचार केल्यानें तो शिक्षा करील. नसेल तर व्यभिचार गुप्त ठेवला कीं झालें !

---

५. पातिव्रत्यादिसङ्केतः बुद्धिमद्दुर्बलैः कृतः।

६. तुल्यत्वे वपुषा मुखाद्यवयवैर्वर्णक्रमः कीदृशः ?








या कल्पनांवर कोणत्याहि सुबुद्ध माणसाचा खरोखरच विश्वास बसूं शकेल हें मला शक्य वाटत नाहीं. पण त्या कल्पनांवरून एक मुद्दा मात्र स्पष्ट होतो तो हा कीं, केवळ पुनर्जन्म, परलोक व ईश्वर मानल्यानें भागत नाहीं, तर दुष्कृत्यें केल्यानें पुढचा जन्म वाईट मिळेल, नरकांत जावें लागेल किंवा ईश्वर शिक्षा करील असेंहि मानायला पाहिजे. म्हणजे दूषित पाणी प्याल्यानें आपोआप रोग होतो तसेंच दुष्कृत्य केल्यानें आपोआपच दुःख भोगावें लागतें अशीच विश्वाची रचना आहे असें मानायला पाहिजे.

पण असें मानल्यानें सुखवादच गृहीत धरल्यासारखें होतें. दुष्कृत्य कां करूं नये तर त्यामुळें दुःख होतें ह्मणून! पण सुखवाद तरी यापेक्षां वेगळें काय सांगतो?

चार्वाकांचा ऐहिक सुखवाद व हा पारलौकिक सुखवाद मूलतः एकच असले तरी ऐहिकवादामुळें चार्वाकांचा सुखवाद पारलौकिक सुखवादाच्या अन्धविश्वांतून निघून विज्ञानाच्या डोळस दुनियेंत आला आहे. कारण कोणतें कृत्य केल्यानें व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनांत दुःख निर्माण होतें हें प्रत्यक्षाच्या आधारें तपासून पाहतां येतें. उलट चोरी केल्यानें, कुत्र्याचा जन्म मिळतो कीं राजाचा, खोटें बोलल्यानें नरकांत जावें लागतें कीं स्वर्गांत व व्यभिचार केल्यानें ईश्वर शिक्षा देतो कीं बक्षीस, हें कोणत्याच प्रमाणानें पडताळून पाहतां येत नाहीं. तेव्हां ऐहिक सुखवादाचें समर्थन करून चार्वाकांनीं विज्ञानभूत नीतिशास्त्राचा पाया घातला असें म्हटलें पाहिजे.

## काम हाच पुरुषार्थ

दुष्कृत्यें केल्यानें त्याचें फळ आपोआपच मिळतें अशी श्रद्धा नसेल तर माणूस स्वार्थासाठीं लोकांचे गळे कापण्यास प्रवृत्त होईल असा एक आक्षेप सुखवादावर नेहमीं घेण्यांत येतो. यावर निर्णायक उत्तर म्हणजे नास्तिकांपेक्षां आस्तिक अधिक नीतिमान् ह्मणजे परहितदक्ष असतात. असें अनुभवावरून दिसत नाहीं हें आहे. ईश्वर, पुनर्जन्म किंवा परलोक यावर माझा विश्वास नाहीं असें ठामपणें ह्मणणाऱ्या लोकांत किती चोर, खुनी किंवा बलात्कारी आढळतात?

अशीं उदाहरणें बहुधा आढळणार नाहींत याचें कारण असें कीं धार्मिक श्रद्धा या नीतीच्या जनक नसून नीति हीच धार्मिक श्रद्धांची जननी आहे. चोरी करणें वाईट आहे. अशी मुळांत श्रद्धा असल्याखेरीज चोरी केल्यानें ईश्वर शिक्षा करील अशी श्रद्धा उत्पन्न होणें शक्य नाहीं. ज्यांना चोरी करणें आवडतें त्यांच्या देवांनाहि चोरी हें कर्तव्य वाटणार हें ठगांच्या उदाहरणावरून स्पष्ट आहे.

ऐहिक सुखवाद एकदां मानल्यावर अर्थ आणि काम हेच फक्त पुरुषार्थ आहेत हें चार्वाकांचें मत आपोआपच सिद्ध होतें. कारण धर्म हा परलोक साधनासाठीं असतो व मोक्ष हा तर बोलूनचालून पारलौकिकच आहे. अर्थ आणि काम हेच ऐहिक आहेत. इहलोकातलीं सुखें दुःखमिश्रित असतात ह्मणून त्यांचा त्याग करणें समंजसपणाचें नाहीं. धान्यांत कोंडा असतो म्हणून कोणी धान्य त्याज्य समजत नाहीं. आंब्यांत कोय असते म्हणून कोणी आंबाच फेकून देत नाहीं. कोण्डा काढून धान्य खावें, कोय फेकून आंब्याचा मधुर रस चाखावा हीच शहाण्याची रीत आहे. जीवनांतलें दुःख शक्य तितकें दूर करून जास्तींत ज्यास्त सुखाचा वाटा उचलणें हाच पुरुषार्थ आहे[७].

पुरुषार्थ याचा अर्थ जीवनाचीं ध्येयें असा केला तर अर्थ आणि काम यांना पुरुषार्थ मानण्यापेक्षां वात्स्यायनाला अनुसरून फक्त काम म्हणजे केवळ sex नव्हे तर सर्व मानवी इच्छांची तृप्ति हाच पुरुषार्थ मानणें अधिक युक्त आहे. कारण अर्थ हें मानवी इच्छा तृप्त करण्याचें केवळ एक साधन आहे, तें जीवनाचें ध्येय नव्हे.

---

७. त्याज्यं सुखं विषयसङ्गमजन्म पुंसां, दुःखोपसुष्टमिति मूर्खविचारणैषा ।
व्रीहीन् जिहासति सितोत्तमतण्डुलाढ्यां, को नाम भोस्तुषकणोपहितान्हितार्थी ?



अनुक्रमणिका







अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. अद्वयानंद गळतगे

# अस्त्रस्पर्धा आणि अणुयुद्धाचा धोका

जें घडेल म्हणून भीति वाटत होती तें शेवटी घडलें -अण्वस्त्रांच्या चाचणीप्रयोगानां पुन्हां सुरवात झाली ! पण क्रुश्चेव यांच्या मतें हे चाचणीप्रयोग शांततेसाठीं आवश्यक आहेत. आपण प्रथम युद्धाला कधीच सुरवात करणार नसलो तरी आपणाला वास्तववादी दृष्टिकोनांतून विचार करणें भाग असल्यामुळें आपल्या इच्छेविरुद्ध हें प्रयोग करणें भाग पडलें असें या विषयीं क्रुश्चेवनीं स्पष्टीकरण केलें आहे. हा वास्तववादी दृष्टिकोन म्हणजे पाश्चात्य राष्ट्रें साम्राज्यवादी आणि युद्धखोर असल्याकारणानें त्याना युद्धापासून परावृत्त करावयाचें झाल्यास त्यांच्या बाँबपेक्षाहि प्रचंड बाँब तयार करून ते त्यांच्यापुढे परजले पाहिजेत, अशाने तीं राष्ट्रें युद्धाचा धसका घेतील आणि मग आपोआपच शांतता प्रस्थापित होईल. ही क्रुश्चेवप्रणीत "बाँबमधून शांतता" योजना म्हणायला हरकत नाहीं. यांत वास्तववादाचा भाग कितपत असेल तो असो. पण किरणोत्सर्गामुळें मनुष्याची जी अपरिमित हानि होत आहे त्याकडे या दृष्टिकोनामध्यें संपूर्ण दुर्लक्ष झालें असल्याने क्रुश्चेव यांची ही तथाकथित शांतता प्रस्थापित करण्याची योजना मनुष्याला महाग पडणार आहे हें स्पष्ट आहे.

क्रुश्चेवनीं रशिया १०० मेगॅटनचे बाँब तयार करीत असल्याचें जाहीर केलें आहे.[1] पण आपला प्रतिस्पर्धीहि असले प्रचंड बाँब तयार करूं शकतो हें क्रुश्चेव विसरले आहेत असें दिसतें.[2] प्रतिस्पर्ध्याला असले बाँब तयार करण्यास क्रुश्चेवनीं हें एक प्रकारचें आव्हान आणि प्रोत्साहनच दिलें आहे असें म्हणतां येईल. अशारीतीने क्रुश्चेव यांची ही शांतता–योजना मानवाला मोठ्या प्रमाणावर किरणोत्सर्गाचा धोका निर्माण करणारी योजना आहे, असें म्हटल्यावाचून गत्यंतर नाहीं.[3]

पण प्रत्यक्षांत मात्र रशियाने एवढ्या मोठ्या बाँबचे प्रयोग केलेले नाहींत. यावरून असा संशय येतो कीं रशियानें एका अगदीच नवीन प्रकारच्या बाँबचे प्रयोग सुरूं केले असावेत. गेल्या वर्षाच्या जूनमध्यें रशिया एका विलक्षण बाँबची योजना आखीत असल्याची क्रुश्चेवनीं जी घोषणा केली होती ती लक्षांत घेतां आणि गेल्या वर्षापासूनचें जिनेव्हा येथील प्रयोगनिर्बंधाविषयीचें रशियाचें

---

१. हिरोशिमावर टाकलेला बाँब ०·० मेगॅटनचा होता. म्हणजे क्रुश्चेव यांचा बाँब याच्या पांच हजार पट मोठा असेल. आतां पर्यंत स्फोट केलेले बाँब (काहीं अपवाद सोडल्यास) १० मेगॅटनच्या खालचेच होते.

२. अमेरिकेचे शास्त्रज्ञ जरूर पडली तर जॅयगॅटन (१००० मेगॅटन) बाँबसुद्धा तयार करूं शकतील असें सांगण्यांत आलें आहे

३. याचें लगेच प्रत्यंतर आलें आहे. कारण रशियाचें पाहून अमेरिकेनेहि चाचणीप्रयोगांना सुरवात केली आहे. हे प्रयोग भुयारांत होणार असले तरी काहीं वातावरणांतहि केले जातील. यासाठींच अमेरिकेनें त्या प्रयोगांच्या बातम्या प्रसिद्ध करावयाच्या नाहींत असें ठरविलें आहे !



अनुक्रमणिका






वेळकाढू धोरण पाहतां हा संशय बळावतो. हा संशय जर खरा असेल तर क्रुश्चेव यांचा 'वास्तववाद' मानवाला विनाशाकडे नेणारा आहे असें म्हटल्यावाचून गत्यंतर नाहीं. आणि हा संशय जर खोटा असेल तर मग क्रुश्चेव यांची १०० मेगॅटन बॉंबची धमकी खरी आहे असें मानणें भाग आहे. दोन्ही दृष्टींनीं क्रुश्चेव यांची योजना मनुष्याला महाग पडणार आहे हें स्पष्ट आहे.

या बाबतींत अमेरिका निर्दोषी आहे असें नाहीं. अलीकडे–म्हणजे केनेडी अध्यक्ष झाल्यापासून अमेरिकेने अण्वस्त्रांच्या चाचणीप्रयोगावरील बंदीसाठीं नेटाने प्रयत्न चालविले असले तरी अमेरिकेच्या संरक्षणखात्यांतील शास्त्रज्ञ न्यूट्रॉन बॉंबवर संशोधन करीतच आहेत. हा अमेरिकन वास्तववादाचा नमुना! अशानें परस्पराविषयीं असलेली संशयी वृत्ति आणि अविश्वास जास्तच वाढत आहेत; आणि त्याचा परिणाम म्हणून शांतता अधिक दूर चालली आहे.

### विज्ञान आणि अस्त्रस्पर्धा

रशियाने अलीकडे अंतराळ क्षेत्रांत संपादलेली प्रगति वैज्ञानिक दृष्टीने जितकी विस्मयकारक आहे तितकीच युद्धाच्या दृष्टीने भयानक आहे. रशियाने अनेक वेळां साडेचार टनी उपग्रह पृथ्वीभोवतीं सोडला आहे. आणि तो इच्छित स्थळीं व इच्छित वेळीं परतहि मिळविला आहे. याचा युद्धाच्या दृष्टीने असा अर्थ होतो कीं रशिया क्रुश्चेव म्हणतात तसले १०० मेगॅटनचे बॉंब पृथ्वीभोवतीं फिरते ठेवू शकतो व वाटेल त्या ठिकाणी व वाटेल त्यावेळीं पृथ्वीवर त्यांचा मारा करूं शकतो. स्वतः अमेरिकेचे शास्त्रज्ञच रशियाच्या या सामर्थ्याबद्दल कबूली देतात. आणि रशियाचा संरक्षणमंत्री मॅलिनोवस्की उघडपणे ही गोष्ट बोलून दाखवितो. चंद्रावर अचूकपणें रॉकेट उतरविण्याच्या रशियाच्या यशस्वी प्रयोगाने तर रॉकेटच्या नेमबाजीमध्यें रशियाचा हातखंडा आहे हें सिद्ध झालें आहे. ब्रिटनच्या जॉड्रेल बॅंकेचे प्रमुख प्रो. बर्नार्ड लॅावेल यानी रशिया रॉकेट क्षेत्रांत अमेरिकेपेक्षा कितीतरी वर्षांनीं पुढें आहे असें मत व्यक्त केलें आहे.

अमेरिका रशियाच्या पाठीमागें असली तरी ती अगदीच पाठीमागें आहे असें नाहीं. अमेरिकेचीं रॉकेट्स टनानीं वजन उचलण्यास असमर्थ असलीं तरी पल्ल्याच्या व अचूकपणाच्या बाबतींत तीं रशियन रॉकेटपेक्षा फार मागें आहेत असें म्हणतां येणार नाहीं. अमेरिकेचें ॲटलास रॉकेट या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. या रॉकेटचा पल्ला ६३०० मैल आहे. पण प्रसंगीं हें रॉकेट ९००० मैलाचासुद्धां पल्ला अचूकपणें गाठूं शकतें हें काहीं दिवसापूर्वीं केलेल्या प्रयोगावरून दिसून आलें आहे.[४] या रॉकेटचीं एंजिनें ३,६०,००० पौंडाचा दाब निर्माण करूं शकतात. अमेरिकेजवळ असलेलें सर्वांत लांब पल्ल्याचें हेंच अस्त्र होय.

याखेरीज अमेरिकेजवळ अनेक मध्यम पल्ल्याचीं रॉकेट्स असून त्यांचा युरोपांतून वापर केला जाणार आहे. यापैकीं 'थोर' हें रॉकेट इंग्लंडमध्यें ठेवण्यांत आलें असून हल्ल्याची पूर्वसूचना केवळ १५ मिनिटें अगोदर देतांच हें रॉकेट शत्रूवर प्रतिहल्ला करूं शकेल. याखेरीज मेटॅडॉर, मिनीटमन, टिटॅन, स्कायबोल्ट, व पोलॅरिस हीं जमिनीवरून, विमानांतून व समुद्रांतून हल्ला करणारीं रॉकेट्स अमेरिकेजवळ असून 'सॅटर्न' या १५ लक्ष पौंडाचा प्रचंड दाब निर्माण करणाऱ्या रॉकेटची योजनाहि अमलात आणली जात आहे.

अमेरिकेच्या पोलॅरिस पाणबुडीचा बराच बोलबाला झाला आहे. पण अमेरिकेजवळ हल्लीं फार

४. रशियन रॉकेट्स ८००० मैलावरचा नेम अचूक गांठू शकतात हें गेल्या वर्षाच्या (व नुकत्याच केलेल्या) त्यांच्या पॅसिफिक महासागरांतील प्रयोगावरून दिसून आलें आहे.











थोड्या पोलॅरिस पाणबुड्या आहेत. मात्र या थोड्या पाणबुड्यामुळेंसुद्धां शत्रूला अमेरिकेवर हल्ला चढविण्यापूर्वी दोनदां विचार करावा लागेल. कारण जमिनीवरचे तळ नष्ट केले तरी अमेरिकेचें अणुसामर्थ्य या पाणबुड्यांच्या रूपाने (प्रत्येक पाणबुडीत १६ पोलॅरिस रॉकेट्स ठेवलेलीं आहेत.) दडलेलें व म्हणून सुरक्षित राहणार आहे. रशियानेहि या क्षेत्रांत बरीच प्रगति केली असणें शक्य आहे. पोलॅरिसच्या धर्तीच्या रॉकेट्सनीं सुसज्ज असलेल्या पुरेशा पाणबुड्या रशियाजवळ असल्याचें क्रुश्चेवनीं बऱ्याच दिवसापूर्वी जाहीर केलें आहे.

जमिनीवरील तळांच्या बाबतींत रशिया अमेरिकेच्या पुढें असून अमेरिकेच्या तुलनेने रशियाला त्याच्या विस्तृत प्रदेशाचा या बाबतींत फारच उपयोग होणार आहे. स्वतः पॅंटॅगॉनच्याच माहितीप्रमाणें रशियामध्यें अमेरिकेला माहीत असलेले ३७ रॉकेट तळ असून ते वॉर्सापासून तहत अलास्काच्या सीमेपर्यंत पसरले आहेत.[५] यापैकी १० तळ ८००० मैल पल्ल्याच्या T–३ रॉकेटचे असून शिवाय रेल्वेसारख्या फिरत्या वाहनावरून रॉकेट्स सोडण्याची रशियाची योजना आहे.

अणु आणि हैड्रोजन बॉंबच्या साठ्याविषयीं व त्यांच्या वैविध्यतेविषयी पाहिलें तर अमेरिका निश्चितच रशियाच्या पुढे आहे. १० मेगॅटनपेक्षाहि मोठे बॉंब हल्ली अमेरिकेजवळ बरेचसे असून सैनिकानां रणांगणावर उपयोगी पडण्यासारखे लहान अणुबॉंबहि अमेरिकेने तयार केले आहेत. (सूटकेसमध्यें मावण्याइतके लहान बॉंब तयार करण्याचाहि प्रयत्न चालला आहे म्हणे!) रशियाचा बॉंबसाठा इतका वैविध्यपूर्ण नसला तरी संहाराच्या दृष्टीनें तो पुरेसा आहे असें सांगितलें जातें. रशियाची प्रचंड गोष्टी करून जगाला दिपविण्याची संवय लक्षांत घेता क्रुश्चेव यांची १०० मेगॅटन बॉंबची योजना खरी असावी असें काहींजण म्हणतात. आणि १०० मेगॅटनइतके प्रचंड बॉंब उचलण्याइतके सामर्थ्यशाली रॉकेट्स रशियाजवळ आहेत हें निर्विवाद आहे. हें सामर्थ्य अमेरिकेजवळ नाहीं हेंहि तितकेंच खरें आहे. पण इतके मोठे बॉंब युद्धाच्या दृष्टीनें मुळींच फायदेशीर नाहींत असें अमेरिकन शास्त्रज्ञ म्हणतात. असें जर असेल तर अमेरिकेला जरब निर्माण करण्यासाठींच हे बॉंब रशिया तयार करीत आहे असें मानणें भाग आहे.[६]

एखाद्या राष्ट्राजवळ कितीहि प्रचंड बॉंब असले तरी शत्रूच्या हल्ल्याची पूर्वसूचना जर त्याला मिळाली नाहीं तर ते बॉंब वापरण्यापूर्वीच नष्ट होतील हें उघड आहे. म्हणून अमेरिकेने मिडास आणि सॅमोस या उपग्रहांची निर्मिति केली असून ते शत्रूच्या हल्ल्याची पूर्वसूचना इन्फ्रारेड डिटेक्टरच्या साह्याने (शत्रूच्या रॉकेटांतील ज्वलनामुळे

---

५. या उलट उत्तर अमेरिकेंत (कॅनडासह) पनामा आणि ग्रीनलंड येथील तळ धरले तर अमेरिकेचे फक्त ८ तळ आहेत.

गेल्या वर्षाच्या मार्चमध्यें मि. केनेथ कीटिंग या सिनेटमधील रिपब्लिकन पक्षाच्या सभासदाने रशियामध्यें जवळजवळ १०० अण्वस्त्रांचे तळ असल्याचें टेलिव्हिजनवर जाहीर केलें होतें. ही बातमी त्यानी कोठून मिळविली हें सांगण्यास मात्र त्यानीं नकार दिला आहे.

६. पण त्यांचा दुसराहि उपयोग असणें शक्य आहे. उदा. १९५८ सालच्या जुलै आणि ऑगस्ट महिन्यामध्यें पॅसिफिक महासागरांत ४० मैल उंचावर केलेल्या अमेरिकेच्या प्रसिद्ध 'आर्गस' प्रयोगामध्यें स्फोट केलेल्या जागेपासून हजारो चौरस मैल अंतराच्या टापूंतील रेडियो दळणवळण आणि रडार संपूर्ण बंद पडल्याचें आढळून आलें होतें. ही रडार व रेडियो 'नाकेबंदी' शत्रूचा हल्ला निष्फळ ठरविण्यास मदत करणारी असल्यामुळें १०० मेगॅटनसारखे बॉंब या कामीं फारच उपयुक्त ठरण्याचा संभव आहे.

निर्माण होणाऱ्या उष्णता किरणांच्या शोधानें ) देऊं शकतात. यामुळे शत्रूने पृथ्वीच्या कोणत्याहि भागातून रॉकेट सोडलें तरी त्याची ताबडतोब पूर्वसूचना मिळूं शकते. या उलट रडार कांहीं शेकडो मैल अंतराच्या मर्यादेतच सूचना देण्याचें कार्य करीत असल्यामुळें हल्ला परतविण्यास किंवा प्रतिहल्ला चढविण्यास कसलीच वेळ मिळत नाहीं. यावरून या उपग्रहींचें महत्व लक्षांत येईल. रशियाने या उपग्रहांवर हेरगिरीचा आरोप करून जी टीका केली तिचें कारण यावरून स्पष्ट होईल.

बॉंबयुग संपून मिसाईलयुग सुरू झालें आहे असें क्रुश्चेव वरचेवर म्हणत असले तरी रशिया बॉंबरच्या क्षेत्रामध्येंसुद्धा नवीन प्रयोग करीत आहे. या संदर्भात काहीं महिन्यापूर्वी एका अमेरिकन मासिकाने रशियाने अणुशक्तीवर चालणाऱ्या बॉंबरचा यशस्वी प्रयोग केला असल्याची जी बातमी प्रसिद्ध केली होती तिचा उल्लेख करतां येईल. या बॉंबरचा वेग तासीं ३५०० मैल असल्याचा सांगण्यांत आला आहे. तसेंच या बॉंबरने मूळ जळणावर २१ दिवस उड्डाण केलें असून सतत तीन महिने आकाशांत उडत राहण्याचेंहि त्याचें सामर्थ्य वर्णन करण्यांत आलें आहे. त्यानें पहिल्या उड्डाणात १७ मैलाची उंची गाठली होती. आणि म्हणून रशियन रडारच्या जाळ्यांतून तो अनेकदा गेला असतांनासुद्धां मुळींच ओळखून आला नाहीं. रडारलाहि चुकविणारा आणि सतत तीन महिने आकाशात राहणारा हा अणु बॉंबर अमेरिकेच्या पोलॅरिस पाणबुडीपेक्षाहि जास्त जरब निर्माण करणारा आहे यात संशय नाहीं.

पण पाश्चात्य राष्ट्रें याबाबतींत पाठीमागें नाहींत. एका विश्वसनीय बातमीनुसार ब्रिटननें पायलटशिवायच केवळ विद्युद्रणकयंत्राच्या सहायाने हजारो मैल युद्धाच्या आघाडीवर जाऊं शकणारा हैड्रोजन बॉंबर तयार केला असल्याचें समजतें. ब्रिटनच्या 'असोशिएटेड इलेक्ट्रिक इंडस्ट्रीज्' या कंपनीनें हे विद्युद्रणकयंत्र तयार केलें आहे. अमेरिकेने पायलटशिवायच हल्ला करणाऱ्या जेट बॉंबर्स ( QB–475 ) चे चाचणीप्रयोग मेक्सिकोच्या आखातांत यापूर्वीच यशस्वीरीत्या केले आहेत. मात्र हे जेट बॉंबर्स विद्युद्रणकयंत्राऐवजी रडारने नियंत्रित केले होते.

याशिवाय B–72 या तासीं २००० मैल वेगाने उडणाऱ्या व रडार बंद पडणाऱ्या व इतर युद्धोपयोगी यंत्रांनीं सुसज्ज असलेल्या एका विलक्षण बॉंबरची अमेरिका तयारी करीत आहे. हल्ली अमेरिकेजवळ असले बॉंबर्स नसले तरी त्यांची उणीव भरून काढण्यासाठीं, तसेंच हल्ल्याची पूर्वसूचना देण्यासाठीं व प्रसंगी प्रतिहल्ला करण्यासाठीं स्ट्रॅटेजिक एअर कमांडचे २८० B–52 बॉंबर्स चोविस तास आकाशांत उड्डाण करीत असून आशियांतील व पॅसिफिक महासागरांतील तळावरचे बॉंबर्स ताबडतोब युद्धावर निघण्यासाठीं कायम सज्ज आहेत.

**अणुयुद्ध झालें तर**

या सर्व तपशीलावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती अशी. कीं भविष्यांत अणुयुद्ध झालें तर दोन्ही राष्ट्रांची बरीच व भरून न काढण्याजोगी हानि होणार आहे. जें राष्ट्र पहिल्यांदा अणुहल्ला चढवील त्याला अणुयुद्धांत वर्चस्व मिळणार आहे, कारण तें राष्ट्र स्वतः बरेंच सुरक्षित राहूं शकेल असें जें कित्येकदा बोललें जातें तें उघडउघड आत्मवंचक आहे. अणुयुद्ध केवळ काहीं तासच टिकूं शकेल असेंहि म्हटलें जातें. आणि याला कारण

७. अमेरिकेचीं कांहीं रडार केंद्रें ( उदा. न्यूजर्सीमधील मूर्सटॉऊनचें प्रचंड रडारकेंद्र ) २००० मैल अंतरावरील रॉकेट शोधण्यास समर्थ आहेत असें सांगितलें जातें. यामुळें अमेरिकेला १५ मिनिटें अगोदर हल्ल्याची पूर्वसूचना मिळेल अशी अपेक्षा आहे. क्षितिजापलीकडील वस्तु रडारने हुडकून काढणें अशक्य नसलें तरी त्याचें अंतर व वेग रडारनें अचूक मोजणें अत्यंत कठीण आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.






अनुक्रमणिका





हल्लीच्या युद्धतंत्राचें झालेलें संपूर्ण यांत्रिकीकरण ( Push-button Warfare ) असें सांगितलें जातें. पण प्रत्यक्षांत असें घडणें संभवनीय नाहीं. रशिया व अमेरिका यांचे रॉकेट व अण्वस्त्रांचे तळ इतके विखुरले आहेत आणि त्यांचीं हल्ला करण्याची साधनें इतकीं विविध आहेत कीं भावी युद्ध केवळ कांहीं तासच टिकेल किंवा पहिला हल्ला करणाऱ्याला युद्धांत निश्चित वर्चस्व मिळेल असें समजणें हें वस्तुस्थितीचें यथार्थ आकलन म्हणतां येणार नाहीं. पहिला हल्ला करणारें राष्ट्र शत्रूची बरीच नासधूस करूं शकेल यात शंका नाहीं. पण ते शत्रूच्या प्रतिहल्ल्यापासून पूर्णपणें मुळींच वाचूं शकणार नाहीं.

पण एकतर्फी अणुहल्ल्यापासून युद्धाला सुरवात होण्यापेक्षां लहान प्रमाणावरचें साधें युद्धच अणुयुद्धामध्यें रूपांतरित होण्याची जास्त शक्यता आहे. या दृष्टीनें केनेडीनी बर्लिनवर प्रसंग पडला तर रशियाशीं मर्यादित युद्ध करण्याचा अमेरिका विचार करीत असल्याची जी मध्यंतरी घोषणा केली होती ती विचारांत घेण्यासारखी आहे. हें मर्यादित बर्लिन-युद्ध जर्मनीपुरतेंच मर्यादित राहील; आणि त्याच्या मर्यादित स्वरूपामुळें युद्धमान राष्ट्रें अणुबाँब न वापरण्याविषयी निर्बंध पाळतील, अशीं दोन गृहीतकृत्यें या मर्यादित युद्धाच्या कल्पनेत अनुस्यूत आहेत. पण हे निर्बंध युद्धमान राष्ट्रें पाळतील याला हमी काय? कृश्चेवखेरीज रशियन सैन्यांतील दुसऱ्या कोणत्या व्यक्तीला अणुबाँब वापरण्याचा अधिकार आहे हें कोणालाच माहीत नाहीं. पण एखाद्या अज्ञात रशियन सेनाधिकाऱ्यानें अणुबाँब वापरलाच तर त्याविरुद्ध काय करतां येण्यासारखें आहे? तसेंच अणुबाँब वापरण्याची वेळ आली आहे अशा निर्णयाला केनेडी आले नसतांना तशा निर्णयाला नाटोचे प्रमुख जनरल नार्स्टड आले तर? आणि आणीबाणीच्या वेळीं पहिला अणुहल्ला निर्णायक असल्याकारणानें प्रत्यक्षांत तशी वेळ आली तर एखाद्या क्षुल्लक सेनाधिकाऱ्यालासुद्धां अणुबाँब वापरण्याचा अधिकार दिला जाणें अशक्य नाहीं. मर्यादित युद्धांत धोके जास्त व सुरक्षितता कमी ही गोष्ट लक्षांत घेतां या जुगारापासून दूर राहणेंच शहाणपणाचें आहे हें स्पष्ट होईल.

वास्तविकरीत्या युद्धतंत्रात झालेल्या क्रांतीमुळें मर्यादितच नव्हे तर कसल्याच प्रकारचें युद्ध धोक्याचें झालें आहे. जोंपर्यंत रॉकेट्स आणि अण्वस्त्रें अस्तित्वांत आहेत तोपर्यंत राष्ट्रें आपापसांतील कलह लढायांनीं मिटवूं म्हणतील तर तें आत्मघातकी ठरणार आहे. मग स्वतः त्या राष्ट्राजवळ अण्वस्त्रें असोत अगर नसोत. युद्धतंत्रांत झालेल्या अपूर्व क्रांतीमुळें युद्धाचीं बीजेंच नष्ट करणें व आपापसांतील कलह युद्धाखेरीज अन्य मार्गांनीं मिटविणें अत्यंत अगत्याचें होऊन बसलें आहे. या क्रांतीपासून हा धडा मनुष्यानें घेतला नाहीं आणि शांततामय मार्गाखेरीज अन्य मार्गाचा त्यानें अवलंब केला तर तो मानवाच्या इतिहासांतील सर्वांत मोठा जुगार ठरणार आहे.

अलीकडील घटनांनीं मात्र या जुगाराची शक्यता वाढविली आहे हें मान्य केलें पाहिजे. आणि म्हणून या भयानक शक्यतेची कारणमीमांसा अगत्याची ठरते.

## राजा कालस्य कारणम्

युद्धें अनेक कारणांमुळें होत असतात. पण त्या सर्वांचे दोन ठळक भाग पाडतां येतील. एक प्राप्त राजकीय व भौगोलिक परिस्थितींतून निर्माण होणारें युद्ध व दुसरें एखाद्या राष्ट्रनायकाच्या महत्त्वाकांक्षेमुळें लादलें गेलेलें युद्ध. पहिल्या प्रकारचें युद्ध कांहींच्या मतें ऐतिहासिक अनिवार्यता ( Historical necessity ) या सदराखालीं येतें. तर दुसऱ्या प्रकारचें युद्ध पुरुषतंत्र असल्यामुळें पूर्णपणें टाळण्यासारखें असतें. दुसरें महायुद्ध हिटलरच्या महत्त्वाकांक्षी वृत्तीमुळें घडलें असल्यानें दुसऱ्या प्रकारांत







मोडतें.[८] पण पहिल्या प्रकारचें युद्ध—म्हणजे केवळ प्राप्त परिस्थितीमुळें निर्माण झालेलें युद्ध हें कितपत निव्वळ परिस्थितिजन्य असतें ? हा प्रश्न विचारार्ह आहे. ज्यामध्यें मानवी कर्तृत्वाचा अगर जबाबदारीचा किंचित्‌हि अंश नाहीं असें युद्ध शक्य मानलें तरी मानवाचें नैतिक स्वातंत्र्य तें मर्यादित करणारें आणि तेवढ्या अंशाने त्याला नैतिक जबाबदारीतून मोकळें करणारें असल्यामुळें हिटलरसारख्या कोत्या बुद्धीच्या आणि स्वार्थी राष्ट्रनायकाला आपणाला ऐतिहासिक अपरिहार्यता म्हणूनच युद्ध करावें लागलें असा युक्तिवाद करून युद्धाच्या नैतिक जबाबदारीतून मोकळें होतां येईल. याच्याहि एक पाऊल पुढे जाऊन डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या तत्त्वाच्या आधारावर युद्धाची अनिवार्यताच नव्हे तर जीवशास्त्रीय आवश्यकताहि त्याला प्रतिपादितां येईल. पण मानवाच्या विकासाचें युद्ध हें आवश्यक साधन मानलें तर मानवाचें तें मोठेंच विडंबन ठरेल. वास्तविकरीत्या युद्धें हीं आवश्यक तर नाहींच, पण कधींच संपूर्णतया अनिवार्यहि नसतात, हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण ज्या युद्धाला ऐतिहासिकदृष्ट्या अनिवार्य म्हणतां येईल त्या युद्धामध्येसुद्धां राजकीय परिस्थितीचा अचूक अर्थ न समजणें व प्रतिस्पर्ध्याच्या हेतूविषयी चुकीचा अंदाज बांधणें इत्यादि अनेक मानवी चुका गृहित धरलेल्याच असतात—नव्हे प्रत्येक युद्धाच्या त्या महत्त्वाच्या घटक असतात दुसरें महायुद्ध हें परिस्थितिजन्य होतें, हिटलरजन्य नव्हतें असें प्रतिपादणाऱ्या ए. जे. पी टेलरनीं सुद्धां राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या चुकामुळें व वस्तुस्थितीच्या अज्ञानामुळें तें घडलें हें मान्य करतात. म्हणजे ऐतिहासिक दृष्ट्या अनिवार्य समजलें जाणारें युद्ध हें वस्तुतः अनिवार्य नाहीं हें उघड होतें. कारण मानवी चुकामुळें जर युद्ध होत असेल तर त्या चुका टाळणें त्याच्या हातांत आहे. आणि जेथें चूक करण्याचें स्वातंत्र्य आहे तेथें ती चक टाळण्याचीहि जबाबदारी असल्याने प्रत्येक युद्ध टाळण्याची जबाबदारी तो टाळू शकत नाहीं. परिस्थिति कितीहि युद्धाला पोषक असली—नव्हे युद्धाकडे खेचून नेणारी असली तरी तिला उलटविण्याचें स्वातंत्र्य त्याला असल्याकारणानें युद्धाची अखेरची व प्रत्यक्ष जबाबदारी तो कधींच टाळू शकत नाहीं.

ही विचारसरणी हल्लीच्या अणुयुगाच्या बदललेल्या परिस्थितीला कितपत लागू होते ? युद्धतंत्राचें संपूर्ण यांत्रिकीकरण झालें असल्यामुळें केनेडी अगर क्रुश्चेव यांची इच्छा नसतानांसुद्धां नव्हे त्यांच्या इच्छेविरुद्ध युद्धाला प्रारंभ होण्याची शक्यता बोलली जात आहे. अशा परिस्थितीत ही विचारसरणी कितपत समर्थनीय ठरते ? अपघाताने युद्धाला प्रारंभ झाल्यास त्याबद्दल क्रुश्चेवना अगर केनेडीना किंवा कोणालाहि कसें जबाबदार धरतां येईल ? अपघातानें युद्धाला प्रारंभ होण्याची शक्यता जितकी अधिक तितकी मानवाची तें युद्ध टाळण्याची जबाबदारीहि अधिक हें विसरतां कामा नये. मानवी इतिहासांत पूर्वी कधीहि नव्हती असली मोठी जबाबदारी अणुयुगीन क्रांतीनें मानवावर येऊन पडली आहे. ही जबाबदारी तो कितपत नेटानें पार पाडतो त्यावरच त्याची जगण्याची योग्यता अवलंबून आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थिति मात्र निराशाच पदरीं आणते.

### क्रुश्चेवकडून युद्धाला प्रारंभ होईल ?

क्रुश्चेव अणुयुद्धाला सुरवात करतील काय ? हा प्रश्न पुष्कळदा विचारला गेला आहे. (हा प्रश्न विचारतांना अर्थात् केनेडी युद्धाला सुरवात करणार नाहींत असें गृहित धरलेलें नाहीं.) आणि या

---

८. पण "the Origins of second world war" या ग्रंथात ए. जे. पी. टेलर यानीं पाश्चात्यांच्या चुकामुळें व तत्कालीन युरोपियन परिस्थितीमुळें दुसरें महायुद्ध ओढवलें, हिटलरच्या महत्त्वाकांक्षेचा त्यात मुळीच भाग नव्हता, हा दृष्टिकोन मांडला आहे.

प्रश्नाचें दोन्ही बाजूनीं उत्तर दिलें गेलें आहे. क्रुश्चेवना युद्ध नको आहे असें म्हणणाऱ्यांच्या मतें युद्ध झालें तर क्रुश्चेव यांचें सोव्हिएट युनियनमध्यें कम्युनिस्ट समाज स्थापण्याचें स्वप्न मुळींच साकार होणार नाहीं. परकीय राष्ट्रामध्यें कम्युनिस्ट सत्ता प्रस्थापित करण्यास लागणारीं चळवळी व घातपातीसारखीं कृत्यें शांततेच्या काळांतच शक्य असल्यानें त्यासाठींहि त्यांना शांतता हवी आहे.[९]

रशियांतील शेती व औद्योगिक परिस्थितीकडे पाहिलें तरीसुद्धां रशियाला युद्ध परवडणारें नाहीं. रशिया धान्योत्पादनाच्या बाबतीत मागासलेला असल्यानें युद्धामुळें जी अन्नसमस्या निर्माण होईल ती त्याला मुळींच सोडवितां येणार नाहीं. औद्योगिक क्षेत्राकडे पाहिलें तर उत्पादनाचें शीघ्रत्व दिसून येत नाहीं. तसेंच दळणवळणाच्या व्यवस्थेचें अजून संपूर्ण आधुनिकीकरण झालेलें नाहीं.

याखेरीज रशियाला अशी भीति आहे कीं युद्ध सुरू झाल्यास रशियाची सत्ता झुगारून देण्याच्या संधीची वाट पहात असलेलीं पूर्वयुरोपांतील असंतुष्ट राष्ट्रें एकदम रशियाच्या गुलागिरीविरुद्ध बंड पुकारतील व लागलीच स्वतंत्र होतील.

शेवटीं क्रुश्चेवनी आतांपर्यंत अनेकदां स्फोटक व गंभीर प्रसंग निर्माण झाले असतांनासुद्धां युद्धाला सुरवात केलेली नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.[१०]

क्रुश्चेवना युद्ध नको आहे यांत संशय नाही. ( निदान तसें गृहित धरायला हरकत नाहीं. ) पण याचा अर्थ कसल्याहि परिस्थितींत क्रुश्चेव्ह युद्ध करण्यास प्रवृत्त होणार नाहींत असा करावयाचा काय ? क्रुश्चेव्ह यांचें मुख्य ध्येय शांतता नसून साम्यवादाचा फैलाव हें असल्याकारणानें व याविषयीं साधनांच्या शुचितेचा त्यांच्यापुढें प्रश्नच नसल्यानें क्रुश्चेव यांच्या धोरणामध्यें युद्ध–अणुयुद्धसुद्धां–समर्थनीय ठरूं शकतें ही गोष्ट स्पष्ट होते. साम्यवादाच्या ऐतिहासिक अपरिहार्यतेविषयी व जग शेवटी साम्यवादाचाच मार्ग अवलंबणार असल्याविषयी क्रुश्चेवना इतका आत्मविश्वास आहे कीं तो अनाठायीं ठरला तर ते युद्धाचा मार्ग अवलंबिल्याखेरीज राहणार नाहींत, अशी एक मोठी भीति व्यक्त केली गेली आहे. अलीकडे रशियाने प्रसिद्ध केलेली २० वर्षांची योजना ही त्याच दिशेनें टाकलेलें पाऊल असून भांडवलशाहीच्या निश्चित विनाशाची व जगावरील साम्यवादाच्या अंतिम विजयाची क्रुश्चेवना खात्री वाटत असल्याचेंच ती दर्शविते असें या मतांचें समर्थन करण्यांत आलें आहे. जगाच्या अधिराज्यासाठीं चाललेल्या सत्तास्पर्धेत भांडवलशाहीची पीछेहाट झालेली असून समाजवादी विचारसरणीचा पगडा सर्वत्र बसला असल्याचें आणि अशारीतीनें जागतिक सत्तास्पर्धेत रशियाला अमेरिकेचें वर्चस्वस्थान मिळालें असल्याचें क्रुश्चेवना खरोखरीच वाटत असेल तर ती भावना दृढ करण्यास अलीकडे बऱ्याच घटना घडल्या आहेत हें मान्य केलें पाहिजे. युरोपियन राष्ट्रांच्या आशियांतील आणि आफ्रिकेंतील वसाहती नष्टप्राय झाल्या असून स्वतंत्र झालेलीं बरींच नवोदित राष्ट्रें समाजवादाकडे वळत असल्यानें युरोपियन राष्ट्रांच्या अगोदर त्यांच्या वसाहती कम्युनिस्ट बनतील हें लेनिनने वर्तविलेलें भविष्य खरें ठरण्याची

---

९. या मतानुसार क्रुश्चेव अणुयुद्ध करणार नसलेनें बर्लिनसारख्या प्रश्नावर त्यांच्याशी वाटाघाटी करतांना त्यांना कसल्याहि सवलती देतां कामा नयेत. या दृष्टिकोनांत सत्यांश असेल. पण धोकाहि आहे हें स्पष्ट आहे.

१०. क्रुश्चेवनीं अण्वस्त्रांची धमकी दिल्यानंतर ब्रिटन आणि फ्रान्स यानीं सुएझमधून जी माघार घेतली ती घेतली नसती तर क्रुश्चेवनीं आपली धमकी अमलांत आणली असती का ? या प्रश्नाचें या मताचे लोक कसें उत्तर देणार आहेत हें कळत नाहीं.







क्रुश्चेवना आशा दिसत असलेनें क्रुश्चेवना साम्यवादाच्या अपरिहार्यतेविषयी व रशियाच्या राजकीय वर्चस्वाविषयी आत्मविश्वास वाटत असल्यास नवल नाहीं.

पण रशियाचा जगावरील राजकीय प्रभाव रोखण्यामध्यें पाश्चात्य भांडवलशाही राष्ट्रें अपयशी ठरलीं आहेत या क्रुश्चेव यांच्या प्रामाणिक श्रद्धेमध्यें पाश्चात्यांचें सामर्थ्य कमी लेखण्याचा धोका आहे. आणि शत्रूच्या सामर्थ्याच्या चुकीच्या कल्पनेमुळेंच महायुद्धें झालीं आहेत ही गोष्ट लक्षांत घेतां हा धोका महत्वाचा आणि गंभीर समजला पाहिजे.[११]

शिवाय अस्त्र व रॉकेटस्पर्धेमध्यें रशिया अमेरिकेपेक्षा वरचढ असल्यामुळें व पाश्चात्य राष्ट्रांतील नेहमी आढळून येणारा एकजुटीचा अभाव हें त्यांच्या दुर्बलतेचेंच एक चिन्ह असल्यामुळें सैनिकी क्षेत्रांतहि रशियाला वरचढपणा मिळाला असल्याविषयीं क्रुश्चेवना विश्वास वाटत असल्यास त्यांत नवल नाहीं. अशा परिस्थितींत एखाद्या राष्ट्रनेत्यानें चढाईचें धोरण स्वीकारलें नाहीं तरच आश्चर्य.

अलीकडे अण्वस्त्रांच्या चांचणीप्रयोगांच्या बंदीविषयीं व निःशस्त्रीकरणाविषयीं रशियानें जें हटवादी धोरण स्वीकारलें आहे त्याची अशा रीतीनें उपपत्ति लावतांयेते असें हा दृष्टिकोन म्हणतो. क्रुश्चेव्ह यांच्या हॅमरशील्डवरील टीकेचा व संयुक्त राष्ट्र-संघावरील रशियाच्या अविश्वासाचाहि हाच अर्थ सांगण्यांत येतो. ही उपपत्ति जर खरी असेल तर युद्धाचा धोका मान्य केला पाहिजे.

## हा धोका टाळण्याचा उपाय ?

हा धोका टाळण्यासाठीं पाश्चात्यांना कांहीं करतां येण्यासारखें नाहीं काय ? असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. गेलीं १६ वर्षें निःशस्त्रीकरणासंबंधी सतत वाटाघाटी आणि चर्चा चालू असूनहि त्यांनीं कांहींच साधलेलें नाहीं, उलट या अवधींत त्या राष्ट्रांनीं अधिक विध्वंसक अस्त्रांची निर्मिति केली आहे हें खरें असलें तरी, आणि चांचणीप्रयोगावरील बंदीसारख्या साध्या प्रश्नावरहि ३०० हून अधिक बैठका होऊनहि त्याविषयीं कसलीच प्रगति झालेली नाहीं. उलट रशियानें चांचणीप्रयोगांना पुन्हां सुरुवात करून तो प्रश्न तीन वर्षांपूर्वीं जेथें होता तेथेंच पुन्हां नेऊन सोडला आहे हेंहि खरें असलें तरी युद्धाचा धोका स्पष्ट दिसत असतांना तो टाळण्यासाठीं कांहींतरी करणें अत्यंत निकडीचें कर्तव्य ठरतें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं सौम्य धोरण स्वीकारणेंच समंजसपणाचें आहे हें स्पष्ट आहे. पण वाटाघाटीसाठीं रशियाकडे प्रथम राजदूत पाठविण्यासारख्या साध्या गोष्टीचा अर्थ आपण दुर्बल आहोत असा रशिया करील म्हणून जेथें अमेरिका प्रथम वाटाघाटींना सुरुवात करीत नाहीं तेथें प्रसंगीं नमतें घेण्याचें धोरण अमेरिका स्वीकारील ही आशा बाळगणें व्यर्थ आहे.

पण नमतें घेतल्याने युद्ध पूर्णपणें टाळतां येईल काय ? फार तर तें पुढे ढकलतां येईल. कारण एके ठिकाणी नमतें घेतल्यास शत्रू दुसऱ्या ठिकाणीहि नमतें घेण्यास भाग पाडील. व ही नमतें घेण्याची परंपरा त्या राष्ट्राला कोठें तरी थांबवावीच लागेल. पण मानवजातीच्या संहाराचा हा प्रश्न असल्यानें युद्धाचा धोका पुढे ढकलतां आला तरी तें काहीं थोडेथोडकें नाहीं. त्यामुळें अधिक टिकावू व कायम स्वरूपाचा समेट घडवून आणण्यासाठीं अवधि तरी

११. दुसऱ्या महायुद्धांत आस्ट्रिया आणि झेकोस्लोव्हाकिया गिळंकृत केल्यानंतर हिटलरने हीच चूक करून डानझिग शहर काबीज केलें. मात्र ब्रिटन युद्धांत पडलें तें केवळ डानझिगसाठीं नाहीं. हेंहि तितकेंच खरें आहे. डानझिग हें सर्व युरोप जिंकण्यासाठी हिटलरने टाकलेलें पहिलें पाऊल होतें असें त्याला वाटलें म्हणून होय. हीच गोष्ट बर्लिनविषयीची आहे. मागे टॉयंबीनी बर्लिन हें पाश्चात्यांच्या श्रद्धेचें प्रतीक आहे असें जें म्हटलें होतें तें या दृष्टीने सूचक आहे.










मिळेल. अणुयुद्धासारख्या मानवजातीच्या जीवन-मरणाच्या प्रश्नाला तोंड देतांना सर्व कांहीं केलें पाहिजे हें उघड आहे.

याविषयी पाश्चात्यांनीं Better dead than Red ( कम्युनिस्ट सत्तेखाली जगण्यापेक्षा युद्धांत मेलेलें पुरविलें ) ही जी वृत्ति धारण केली आहे ती फारच निराशाजनक आहे. युद्धाची भाषा ही अणु-युगपूर्व काळांत समर्थनीय आणि शक्य होती. पण अणुयुगीन युद्धतंत्रांतील क्रांतीमुळें युद्ध मानवाच्या कसल्याहि फायद्याचें ठरणार नसल्यामुळें, उलट त्यामुळें त्याच्या सर्वनाशाची शक्यता निर्माण झाली असल्यामुळें अगदीच मूर्खपणाची ठरते. शिवाय ज्याना कम्युनिझम आणि कॅपिटॅलिझम यापैकी कोणतीहि मतप्रणाली पसंत नाहीं अशा तटस्थ लोकावर अणु-युद्धामुळें मृत्यु ओढवणार असल्याने तो त्यांच्या स्वातंत्र्याचा अपहार ठरणार आहे. म्हणजे ज्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यासाठीं पाश्चात्य राष्ट्रें युद्ध करणार आहेत तें स्वातंत्र्यच त्या युद्धामुळें नाकारलें जाणार आहे. आणि म्हणून तें युद्ध तत्वहीन आणि असमर्थनीय ठरतें.

अणुयुद्धामुळें सर्व मानवजात नष्ट होणार नाहीं हें खरें आहे पण अणुयुद्धाचें तत्व एकदां मान्य केल्यास अणुयुद्धाची परंपरा पडेल. आणि पहिल्या नसलें तरी दुसऱ्या किंवा तिसऱ्या अणुयुद्धामध्यें मानवजात नष्ट होण्याची शक्यता आहे. नाहीं कोणी म्हणावें ? दुसरें असें कीं अणुयुद्धाला पर्याय कम्युनिस्ट वर्चस्व असल्याचें मान्य केलें तरी तें वर्चस्व हाणून पाडण्यासाठीं प्रयत्न करणें शक्य आहे. पण अणु-युद्धाचा मृत्यूच जर पत्करला तर काय करणें शक्य आहे ! हा दृष्टिकोन प्रसिद्ध ब्रिटिश तत्वज्ञ बर्ट्रांड रसेल यानीं मांडला आहे.

पण साम्यवादाच्या 'ऐतिहासिक अपरिहार्यते'मुळें जागतिक राजकारणांत रशिया अमेरिकेपेक्षां वरचढ ठरला आहे या कुश्चेव यांच्या श्रद्धेतून व त्यातून निर्माण झालेल्या पाश्चात्यांचें सामर्थ्य कमी लेखण्याच्या धोक्यांतून युद्धाची शक्यता निर्माण झाली आहे अशी जी वर कारणमीमांसा मांडली आहे ती मान्य केल्यास रसेल यांचा दृष्टिकोन निष्प्रयोजक ठरतो. भांडवलशाही सत्तागटाशीं युद्ध अटळ आहे अशी विचारसरणी बाळगणाऱ्या चीनशीं रशिया सह-मत नसला तरी साम्यवादाचा जगावरील अंतिम विजय युद्धानेंच साधणार आहे अशी खात्री झाली तर कुश्चेव युद्धालाहि मागेपुढे पाहणार नाहींत. आतां-पर्यंतच्या कम्युनिस्ट क्रांत्या रक्तलांछित असून कोण-तेंहि सत्तांतर शांततेने कधींच पार पडत नाहीं असें कम्युनिस्ट गृहितकृत्य आहे, हें विसरतां येत नाहीं. यासाठीं पाश्चात्यांनीं **ऐतिहासिकदृष्टया साम्यवाद अपरिहार्य नाहीं,** हें रशियाला दाखवून दिलें पाहिजे व त्यासाठीं मागसलेल्या राष्ट्रांना आर्थिक मदत करून त्यांच्यात स्वातंत्र्याची परंपरा निर्माण करण्याचा एकीकडे प्रयत्न करीत असतानांच दुसरी-कडे आपलें सैन्यबळ वाढवून पाश्चात्यांचें सामर्थ्य सर्व दृष्टीनीं परिपूर्ण व रशियाशी तुल्यबळ असल्याची रशियाची खात्री पटवून देण्याचाहि प्रयत्न केला पाहिजे. या मतानुसार रशियाशीं खंबीर आणि न वाकणारें धोरण स्वीकारलें तरच अणुयुद्ध टाळणें शक्य आहे. रशिया जर सैन्यबळानें आपला हेतु साध्य करूं पाहील तर त्याला पाश्चात्य राष्ट्रें सैन्यबळानेंच व निकरानें विरोध करतील याविषयीं रशियाच्या मनांत जर कसलाहि संशय उरूं दिला नाहीं तर मुळींच युद्ध होणार नाहीं. हा दृष्टिकोन पाश्चात्य राष्ट्रांत बऱ्याच जणांनीं मांडला असून त्यामध्यें सिडने हूक हेहि एक आहेत. त्यांनीं रसेल यांचा दृष्टिकोन अपुरा ठरवून त्यांच्याशी याविषयीं आपला मतभेद व्यक्त केला आहे.

### न धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः

अणुयुद्धांत सर्वनाश होण्याची शक्यता निर्माण

झाली असल्यानें रसेल हे जिवंत रहाण्या· ( Survival ) चा प्रश्न महत्त्वाचा समजतात. पण सिडने हूक यांच्या मतें केवळ जिवंत राहणें हें मानवी मूल्य होऊं शकत नाहीं. ( नाहीं तरी खालच्या वर्गांतील प्राणी जिवंत असतातच. ) केवळ जगणें हें मानवाचें ध्येय नव्हे. स्वतंत्र वृत्तीनें व शांततेनें जगणें हें मानवानें निर्माण केलेलें मूल्य असून त्या मूल्यासाठीं आत्माहुति देण्याची तयारी दर्शविणें हा मानवाचा मोठेपणा आहे. स्वतःच्या मूल्यासाठीं व स्वातंत्र्यासाठीं मनुष्य झगडला नसता तर तो केव्हांच रानटी टोळयांचा भक्ष्य बनला असता. तेव्हां स्वातंत्र्यासाठीं व इतर मानवी मूल्यासाठीं ज्यांनीं आत्माहुति दिली त्यांच्याशी प्रतारणा करावयाची नसेल तर ही आत्माहुति देण्याची आपली तयारी असली पाहिजे. ही आत्माहुति द्यावयाची म्हणजे मरणाची भीति जिंकली पाहिजे. मरणाची भीति जिंकल्याखेरीज मनुष्याला उदात्त आणि मानाचें जीवन कधींच जगतां येणार नाहीं. मरणाची भीति जिंकणें म्हणजे केवळ जिवंत राहण्या– ( Survival ) साठीं वाटेल ती नामुष्कीची गोष्ट न करणें होय. केवळ जगण्यासाठीं आपणाला न आवडणारीहि गोष्ट करणें हें मनुष्याला लांछनास्पद आहे. काहीं प्रकारचें जीवन मनुष्याला न शोभणारें आहे हें आपण मान्य करतो. आणि असलें जीवन जगण्यापेक्षां मरण पत्करलें तर मानव्याला जागल्यासारखें होईल. मानवी मूल्यें व मानवी स्वातंत्र्य यांचें रक्षण करण्यासाठीं ज्यानीं बलिदान केलें त्यांची परंपरा राखल्यासारखें होईल.

रसेलशी याविषयी सिडने हूक यांचा मतभेद असला तरी रसेलनी ज्या मानवी मूल्यांची जपणूक केली व स्वातंत्र्याची पाश्चात्य परंपरा घडविण्यास मदत केली त्या मूल्यांची व परंपरेची या दृष्टिकोनांत तरफदारी व जपणूकच होत आहे असें मत आणि समाधान त्यानीं शेवटीं व्यक्त केलें आहे.

पण मरण आणि कम्युनिस्ट गुलामगिरी असा जर पर्याय लोकासमोर ठेवला तर कितीजण मरण्याचें स्वातंत्र्य पसंत करतील ? कितीजण मरणाची भीति जिंकू शकतील ? फारच थोडे हें उघड आहे. याचें कारण सामान्य मनुष्य एखाद्या उदात्त तत्त्वासाठीं अगर मूल्यासाठीं जगत नसून खाण्यासाठीं, प्रेम करण्यासाठीं व इतर भौतिक सुखें उपभोगण्यासाठीं जगत असतो. त्याच्या दैनंदिन जीवनांत कम्युनिझम व स्वातंत्र्य या गोष्टीपेक्षां भौतिक सुख देणाऱ्या गोष्टींना जास्त महत्वाचें स्थान आहे. अशा मनुष्यावर अणुयुद्धाचें मरण सक्तीनें लादणें हा त्याच्या स्वातंत्र्याचा अपहार नव्हे काय ?

पण सामान्य मनुष्याला जर खऱ्या स्वातंत्र्याचा अर्थ कळत नसेल व भौतिक सुखोपभोग हेंच जीवित-सर्वस्व असें तो मानत असेल तर त्याला त्या स्वातंत्र्याची ओळख करून देणें आपलें कर्तव्य नाहीं काय ? डुकराप्रमाणें भौतिक जीवन जगण्यांत सुख असेल. पण त्यांत आनंद मानणें मनुष्यत्वाला सोडून आहे. अशा माणसावर उच्च ध्येय सक्तीने लादणें हा त्याच्या स्वातंत्र्याचा मुळींच अपहार नाहीं.

### जागतिक सरकाराकडे

पण मरण किंवा कम्युनिस्ट गुलामगिरी असा खरोखरींच पर्याय आहे काय ? ज्यामध्यें मरणहि नाहीं आणि कम्युनिस्ट गुलामगिरीहि नाहीं अशी व्यवस्था निर्माण करतां येणार नाहीं काय ? सुदैवानें क्रुश्चेवनीं शाब्दिक का होईना सहजीवनाचें तत्व मान्य केलें आहे. तसेंच निःशस्त्रीकरणाची आवश्यकताहि मान्य केली आहे. पण संपूर्ण निःशस्त्रीकरण अनिष्ट आहे हें उघड आहे. कारण एकाद्या लहान राष्ट्रावर त्याच्यापेक्षा मोठ्या राष्ट्रानें हल्ला केला तर त्या राष्ट्राला त्याविषयी काहींच करतां येणार नाहीं. तो हल्ला परतवून लावण्यासाठीं तें राष्ट्र बड्या राष्ट्रांची मुळींच मदत घेऊं शकणार नाहीं. कारण बडीं राष्ट्रें निःशस्त्र झालेलीं असतील. अशा परिस्थितीत तो








अन्याय तसाच चालू ठेवणें भाग पडतें. याचसाठीं निःशस्त्रीकरणाबरोबर एकादें आंतरराष्ट्रीय सैन्यबळ ( International Force ) निर्माण करणें आवश्यक ठरतें. या आंतरराष्ट्रीय सैन्यबळाची कल्पना क्रुश्चेव यांच्या अलीकडील निःशस्त्रीकरणाच्या योजनेत अनुस्यूत आहे. ही आंतरराष्ट्रीय सैन्यबळाची योजना म्हणजे शेवटीं जागतिक सरकाराचीच योजना असल्याने कम्युनिस्ट आणि पाश्चात्य सत्तागटांचे हितसंबंध अबाधित राखण्याचें व पर्यायानें युद्ध टाळण्याचें तेंच अखेरचें एकमेव साधन म्हणतां येईल.

पण क्रुश्चेव अलीकडे ' ट्रॉयका ' तत्वाचा पुरस्कार करीत असल्यामुळें रशियाच्या व्हेटोपासून मुक्त असलेली जागतिक संस्था त्यांना मान्य नाहीं हें उघड आहे. म्हणजे जागतिक सरकाराची गरज एकीकडे मान्य करूनहि तें जर रशियाच्या प्रभावापासून अलिप्त असेल तर दुसरीकडे तें त्यांना मान्य नाहीं. पण व्हेटोच्या अधिकारामुळें सरकारांतील अर्थच नष्ट होतो हें स्पष्ट आहे. ज्या सरकारामध्यें एकाद्या सभासदाला एकादा कायदा आपणाला आवडला नाहीं, अगर आपल्या हिताचा वाटला नाहीं तर फेटाळून लावण्याचा अधिकार वापरतां येतो त्याला सरकार म्हणणें हा सरकार शब्दाचा दुरुपयोग आहे. संयुक्त–राष्ट्र–संघ ही संस्था जागतिक प्रश्न सोडवूं शकलेली नाहीं याचें हेंच कारण आहे. अशा रीतीनें क्रुश्चेवना जागतिक सरकाराची गरज वाटत असूनहि सरकाराला आवश्यक असलेले सर्व गुण मात्र त्याला बहाल करायला ते तयार नाहींत. क्रुश्चेवनां जागतिक सरकाराची आवश्यकता वाटते याविषयी शंकाच नाहीं. किंबहुना त्याना त्याची जितकी गरज वाटते तितकी इतराना क्वचितच वाटत असेल. पण त्यांचें हें जागतिक सरकार कम्युनिस्ट प्रभावाखालीं राहिलें पाहिजे !

अशारीतीनें आपण पुन्हा मूळ स्थानाला–थंडया युद्धाला–येऊन पोहोंचतो. वस्तुस्थिति अशी आहे कीं राजकीय मतप्रणालीमुळें विभागलेल्या जगांत जागतिक सरकार स्थापणें अशक्य नसलें तरी अत्यंत कठीण आहे. निःशस्त्रीकरणाचें घोंगडें भिजत पडलें आहे याचें कारण निःशस्त्रीकरणाची योजना टप्प्या–टप्प्यानी अमलात आणण्यांत तपासणीसारख्या तांत्रिक अडचणी आहेत म्हणून नव्हे तर परस्परविरोधी राजकीय मतप्रणालीमुळें या दोन सत्तागटांना परस्पराविषयी संशय आणि अविश्वास वाटत आहे म्हणूनच होय.[१२] परस्पराविषयीचा हा संशय आणि अविश्वास नाहींसा झाला तर निःशस्त्रीकरणाचा प्रश्न चुटकीसारखा सुटतो. आणि एकदा निःशस्त्रीकरण अमलांत आलें तर त्याच्या पुढचें पाऊल– आंतरराष्ट्रीय सैन्यबळ आणि जागतिक सरकार– हें काहीं फार दूर नाहीं. किंबहुना हे दोन्ही प्रश्न परस्परात गुंतले असल्याकारणानें कोणताहि एक प्रश्न सोडवितांना दुसरा आपोआपच सुटतो. खरी अडचण आहे ती परस्पराविषयीच्या या अविश्वासाची– आणि सर्वांत महत्वाचें म्हणजे हा अविश्वास निर्माण करण्यास कारणीभूत झालेल्या राजकीय मतप्रणालीची.

अशारीतीनें भिन्न राजकीय मतप्रणाली ही अणुयुगांतील मानवी प्रगतीची सर्वात मोठी धोंड ठरली आहे. भिन्न मतप्रणाल्या असूं नयेत असें कोणीच म्हणत नाहीत. पण त्यांचा शांततेनें समेट घडवून आणण्याची अणुयुगानें जी गरज निर्माण केली आहे तिकडे पुरेसें लक्ष दिलें गेलेलें नाहीं. अशा परिस्थितीत जगाची भवितव्यता काय असा मनांत विचार येऊन मन काळवंडून जातें मात्र राजकीय मतप्रणालीचा चिवटपणा शेवटीं अणुयुद्धानें जर तपासला जाणार असेल तर तो मानवाच्या इतिहासांतील सर्वात मोठा मूर्खपणा ठरणार आहे, याविषयी सर्वांचेंच एकमत आहे.

---

१२ तसें पाहिलें तर संयुक्त-राष्ट्र-संघाच्या आमसभेने १९५९ सालींच "संपूर्ण आणि सार्वत्रिक निःशस्त्रीकरण" एकमतानें मंजूर केलें आहे.





अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६–०–० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चां. अ. दाभोलकर) .... | २–०–० |

अनुक्रमणिका

श्री. ना. गो. चापेकर

# धर्मनिर्णयमंडळाचें पंचांग

पांच अंगें असल्यानें पंचांग शब्द अस्तित्वांत आला. तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण हीं तीं पांच अंगें होत. तथापि हीं अंगें असलीं म्हणजे पंचांग संपूर्णपणें सांग झालें असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. वर्ष, अयन, महिना, पक्ष, राशिस्थग्रह ह्यांचीहि आवश्यकता नाकारतां येणार नाहीं. कारण कर्मारंभीं संकल्प म्हणतात त्यांत ह्या सर्वांचा उच्चार करण्याची वहिवाट आहे. देशकालवर्तमानापैकीं ह्या काल झाला. स्थलभिन्नतेमुळें पंचांगांत देशाचा समावेश करतां येणें शक्य नाहीं. तथापि स्थानिक पंचांगांत तो घालण्यास हरकत नसावी. भौगोलिक व खगोलिक ज्ञान अशा संकल्पाने आपोआप मिळतें.

कालाचें ज्ञान आपणांस सूर्यचन्द्रांमुळें होतें. सूर्याच्या उदयास्तांवरून अखंडित काळाचें खंडन करून दिवस हें माप निर्माण केलं; अमावास्या व पूर्णिमा ह्यांवरून महिन्यांचें ज्ञान झालें. ह्यास्तव पंचांगांत सूर्यचंद्रांचें महत्त्व फार मोठें आहे.

हिंदूंच्या पंचांगाप्रमाणें जगांत दुसऱ्या कोणत्याहि लोकांचें पंचांग नसेल. आमचे दैनंदिन आचार धर्मान्वित आहेत. आणि ह्या कर्मांचें शुभाशुभत्व आकाशांतील ग्रहांवर अवलंबून आहे. ह्या कारणानें आकाशांत ग्रह कोठें आहेत ह्याचें यथार्थ ज्ञान असणें इष्ट आहे. अशा रीतीनें आकाश व पृथ्वी ह्यांना जोडणारा पंचांग हा दुवा आहे.

पंचांगांत प्रत्येक तिथीच्या किंवा दिवसाच्या पुढें अगदीं शेवटल्या भागांत त्या तिथीला अथवा दिवसाला करावयाच्या धार्मिक कर्मांचा निर्देश केलेला असतो. हा धर्मशास्त्राचा विषय आहे, ज्योतिषाचा नाहीं. हें धर्मशास्त्र पंचांगांत केव्हांपासून आलें तें समजत नाहीं. ज्योतिषी हा धर्मशास्त्रज्ञ नसतो. पंचांग पाहून धर्मग्रंथान्वयें आज काय करावयाचें तें वस्तुतः प्रत्येकानें आपण ठरविलें पाहिजे. परंतु पंचांगकर्ते आमच्यापुढें वाढलेलें ताट आणून देतात. त्याचा परिणाम असा झाला कीं, स्मृतिग्रंथ मागें पडलेच पण धर्मसिंधूसारख्या निबंधग्रंथांचेंहि अवलोकन करण्याचें कारण उरलें नाहीं. कायद्याचें ज्ञान मूळ ग्रंथ न उघडतां टिपणी पुस्तकांवरून विद्यार्थी कायदेपंडित बनतात तोच प्रकार पंचांगाच्या बाबतींत घडतो. अलीकडे तर कांहीं पंचांगकर्ते आपल्या पंचांगांना ज्ञानकोश बनवीत आहेत. धर्मकृत्यें सांगण्यांत तारतम्य वापरलेलें दिसत नाहीं. बहुतेक श्राद्धें आतां लुप्त झालीं असतांना मन्वादि कल्पादि पंचांगांत आहेतच. अग्न्याधान ह्या पंचांगकर्त्यांना कोठें आढळतें काय ? तरी पण अन्वाधान, इष्टि पंचांगाची जागा अडवतातच. यमघंट आपली घंटा वाजवीत असतोच. कालाष्टमी, दुर्गाष्टमी, वरूथिनी-योगिनी एकादशी लिहिण्याचा हेतु लोकांना धर्मज्ञान करून देण्याचा आहे काय ? ह्या भारुडानें पंचांगाची किंमत मात्र निष्कारण वाढते.

पूर्वीचीं हस्तलिखित पंचांगें स्थानिक स्वरूपाचीं होतीं. निजकाल समजण्यास त्यांचा उपयोग चांगला होई. आतां भारताची एकात्मता व ऐक्य ह्यांची घडण होत असतांना भारताचें एक पंचांग असण्याची आवश्यकता तीव्रतेनें भासूं लागली ह्यांत आश्चर्य नाहीं. तदनुसार सरकारनें एक समिति नेमली व तिनें पंचांग तयारहि केलं. ह्या समितींत दप्तरी, वैद्य, करंदाकर असे तीन महाराष्ट्रीय सदस्य होते. तथापि संमत झालेल्या तत्त्वानुसार पंचांग न निघाल्यामुळें धर्मनिर्णय मंडळाला प्रस्तुत पंचांगाचा खटाटोप करणें भाग पडलें. ह्या मंडळाचे उत्साही कार्यवाह तर्कतीर्थ कोकजे ह्यांनीं ही फारच प्रशंसनीय अशी कामगिरी केली आहे. ह्या संबंधांत महाराष्ट्राची परंपरा उज्वल आहे. शंकर बाळकृष्ण दीक्षितांचा अप्रतिम ग्रंथ येथेंच झाला. पंचांग सुधारण्याचे यत्न अनेक वेळां येथेंच झाले. धर्मनिर्णय मंडळाने नेमलेल्या समितींत







कृष्णराम भट्ट, त्रिवेदी, प्रधान, सोमण, सुळे, गोखले, देव, पंडित असे नामांकित ज्योतिषी होते. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, ह्या मंडळींत सायनवादी आहेत; निरयणवादी आहेत; वेगवेगळ्या अयनांशांचा पुरस्कार करणारे आहेत. अशा विविध मतांच्या विद्वानांनी पुरस्कृत केलेलें हें हिंदी पंचांग आहे. पंचांगाची घसरलेली गाडी योग्य मार्गावर आली आहे ह्याचें हें निदर्शक आहे. कांहीं मार्गापर्यंत तरी झालेली ही एकवाक्यता महाराष्ट्राच्या इतिहासांत अद्वितीय ठरेल ह्यांत शंका नाहीं. तथापि अनुभव असा आहे कीं, अज्ञानाच्या पुढें हात टेकावे लागतात. टिळक पंचांगाचेंच उदाहरण पहा. गांधींच्या पूर्वी टिळक हे जवळजवळ अखिल भारताचे एकमेव पुढारी होते. परंतु त्यांनी संपादिलेल्या पंचांगाची आज केविलवाणी स्थिति झालेली आहे. आपणांस समजत नाहीं तर ज्यांना समजतें त्यांचें ऐकावें ही वृत्ति नाहीं.

आपण संकल्पांत आकाशस्थ ग्रहांचा उच्चार करितों त्याचा दृग्प्रत्यय आला नाहीं म्हणजे पंचांग चुकलें आहे म्हणून समजावें. पंचांगांचें गणित ग्रंथोक्त असतें. प्रत्यक्ष वेध घेऊन करीत नाहींत. ग्रहांचें गतिमान वेध घेऊन ठरवितात. हें वेध घेण्याचें काम बराच काळ केल्यावांचून निश्चित करतां येत नाहीं. हल्लींच्या प्रमाणें प्राचीन वेधयंत्रें सूक्ष्म असणें संभवनीय दिसत नाहीं. पृथ्वी सूर्याभोंवतीं लंबगोलांत फिरते अशा स्थितींत आरंभस्थान वाटेल तें होऊं शकतें. सूर्याभोंवतीं एक फेरा करण्यास पृथ्वीला एक वर्ष लागतें. पण हें वर्ष मोजावयाचें कोठून ? आपल्याकडे वर्षारंभ चैत्रांत होतो. चैत्र महिना हा मेष राशीचा महिना. मेष संपातापासून आरंभ होतो असें आपण मानूं या. अश्विनी नक्षत्रापासून मेष राशीला आरंभ होतो. तेव्हां अश्विनी नक्षत्रावर सूर्य आला कीं, नवीन वर्षाचा प्रारंभ आणि रेवतीनक्षत्रपुंजांतील एका ताऱ्यावर सूर्य आला की एक वर्ष पुरें झालें. ह्या ताऱ्याला योगतारा म्हणतात. आतां, चुकी होण्याचीं दोन कारणें आहेत. प्रथम आमचें वर्षमान वास्तव नाक्षत्र वर्षमानापेक्षां सुमारें ८·६ पळें जास्त आहे. दुसरें कारण संपाताला विलोमचलन आहे. ह्या गोष्टीचें अज्ञान म्हणजे संपातबिंदु दर वर्षाला सुमारें ५० विकला मागें येतो आणि वर्षप्रारंभ ८·६ पळांनीं पुढें जातो. हें असें कित्येक वर्षें चाललें. ऋतु संपातावर अवलंबून असतात. ह्या ऋतूंतील फरकामुळें संपाताला चलन आहे हें ध्यानांत आलें. चैत्र वैशाख वसंत ऋतु हा पाठ होऊन बसला. परंतु आज वसंत ऋतु फाल्गुनांत होतो. संपात व रेवती योगतारा ह्यांतील अंतर तें अयनांश. संपात व रेवती योगतारा ह्यांचा एकत्रपणा तुटला आहे. संपात मागें हटला. वेधानें संपातबिंदु निश्चित करितां येतो. तो जेथें असेल तेथून योगतारेशीं येण्यास सूर्याला तेथपर्यंतचें अंतर तोडावें लागेल. ह्यास्तव मेषसंक्रमण केव्हां होईल हें ठरवितां यावें म्हणून अयनांश हिशेबांत घ्यावे लागतात. संपातापासून आपण वर्षारंभ धरला आणि तो संपात पूर्वस्थानावरून चलित केव्हां झाला हें माहीत नाहीं. तें निश्चित करण्यास संपाताची गति समजली पाहिजे आणि ही गति ठरविण्यास अनेक वर्षें सारखे वेध घेतले पाहिजेत. पंचांगें दरसाल वेध घेऊन कोणी करीत नाहीं. एकदां सारणी केली असेल त्याप्रमाणें गणिताने तयार होतात. म्हणून अयनांश किती घ्यावयाचे हा वाद उत्पन्न होतो. हा अयनांशाचा गोंधळ व पंचांगांतल्या चुका ह्यावरून हें उघड होतें कीं, आज हजार दीडहजार वर्षें आम्ही चुकीचीं धार्मिक कृत्यें करीत आहोत. अश्विनी नक्षत्र शुभ म्हणून समजावयाचें पण तें भरणी असावयाचें. पंचांग शुद्धीची चळवळ कां करावी लागली हें ह्यावरून समजेल.

धर्मनिर्णय मंडळाच्या पंचांगानें ह्या शुद्धीकरण्याच्या बाबतींत बरीच मजल मारली आहे; शिवाय अजून गांठावयाचें आहे. पहिला मोठा बदल म्हणजे सांपातिक वर्षाचा स्वीकार. तर कांहीं पंचांगांत हेंच वर्ष मान्यता पावलें आहे हें खरें. परंतु धर्मनिर्णयमंडळानें सरकारच्या पूर्वी कित्येक वर्षें सांपातिक-आर्तव वर्षाची शिफारस केली होती. सांपातिक वर्ष हें निसर्गसिद्ध वर्ष आहे. पृथ्वी सूर्याभोवतीं फिरते. तिचा एक फेरा पुरा होण्यास जो काळ लागतो तें वर्ष. सांप्रत चांद्रमान प्रचलित आहे. सूर्य चंद्र एकत्र अगर समोरासमोर येतात ते एका महिन्यांत. असे बारा महिने म्हणजे एक वर्ष. ह्यांत चन्द्राला महत्त्व आहे. परंतु चन्द्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे. तो पृथ्वीभोवतीं फिरतो. पृथ्वी चंद्रा-








भोंवतीं फिरत नाहीं. शिवाय सौर वर्षाहून चांद्रवर्ष अकरा दिवसांनीं कमी आहे. दिवस व ऋतु सूर्यामुळें तर महिने चन्द्रामुळें समजतात. पूर्णिमा व अमावास्या हे दिवस महिन्याचें ज्ञान होण्याचें ठळक साधन आहे; पण वर्षाचें साधन कोणतें ? वर्ष ओळखण्यास ऋतु हेंच प्रमुख साधन होय. तथापि ऋतूचें आगमन ठळकपणें पहिल्या दिवशीं कळण्यासारखें नाहीं. अमुक संपाती वसंत ऋतु सुरुवात होणार हें ठरलेलेंच. ह्या कारणाने सायन सूर्यावरून वर्षाची कल्पना निश्चित झाली असावी असें दिसतें. तात्पर्य, वर्ष हें सायनच असलें पाहिजे हें स्पष्ट दिसतें. विषुवदिन हा निश्चित दिन आहे. तो इंग्रेजी तारखेप्रमाणें २१ मार्च हा आहे. अर्थात दुसऱ्या दिवसापासून वर्षारंभ. तो २२ मार्चला होणार हीच चैत्र शुद्ध प्रतिपदा म्हणावयाची. २२ मार्चला आरंभ व २१ मार्चला अखेर असें ह्या पंचांगाचें स्वरूप आहे. ह्या वर्षींचे सुमारें तीनशें सव्वापासष्ट दिवस होतात. ३६५ दिवसांची वाटणी सात महिन्यांचे प्रत्येकीं ३० दिवस व पांच महिन्यांचे ३१ दिवस अशी केली आहे. कांहीं वर्षांनीं १ दिवस जादा घेऊन पृथ्वीच्या फेऱ्याची कालगणना पुरी केली आहे.

धर्मनिर्णय मंडळाचें पंचांग हें संयुक्त पंचांग आहे. जुन्या पंचांगांतील माहितीहि ह्यांत मिळेल. त्यांत अधिक महिना आहे. इष्टया अन्वाधानें आहेत; एकादशा, सोमवत्या सर्व कांहीं आहे. भारतवर्षाच्या पहिल्या दिवशीं चैत्र शुद्ध ६ आहे. तसेंच वर्षाची समाप्ति फाल्गुन शुद्ध १५ ला होते. पुढील सालीं फाल्गुन व॥ १ ला भारतवर्षारंभ होईल ( २२ मार्च ).

सरकारी पंचांग प्रसिद्ध झालें असतां धर्मनिर्णय मंडळाच्या पंचागाची गरज काय असा प्रश्न कोणीहि विचारील. ह्याचें उत्तर सरकारी नोकरांच्या हलगर्जीपणांत आढळेल. उदा. योग हे सायन दिले पाहिजेत. असें असून व्यतिपात व वैधृति खेरीज करून बाकीचे सर्व योग निरयन दिले आहेत. गैदीपणाचें आणखी दुसरें उदाहरण पहा. सरकारी हिंदी पंचांगांत १३ एप्रिल १९६० ह्या दिवसापुढें मेषेचा निरयन सूर्यराशिचार ११।१० घ. असा दिला आहे, पण मराठी पंचांगांत तो शेरा गाळला आहे. ( सरकारी पंचांग १२ प्रांतीय भाषांत प्रसिद्ध होतें. ) बरें, मेष राशी संबंधानेंच हें सांगण्याचें कारण काय ?

दुसरी गम्मत अशी कीं, २३ अं. १५ क. हे स्थिर अंश मानावयाचें ठरलें, तें केवळ लोकांच्या भ्रामकपणामुळें मनांत घट्ट घर करून बसलेल्या कांहीं समजुतींना (उ. १४ जानेवारीसच संक्रांत यावयाची) धक्का बसूं नये म्हणून. वस्तुतः स्थिर अयनांश हा वदतो व्याघात आहे. ह्यास्तव २३ अं. १५ क. अयनांश स्वीकारण्याचें कारण सरकारी पंचांगांत द्यावयास पाहिजे होतें. पण तसें झालें नाहीं. अशा आणखी कांहीं सरकारी पंचांगांतील उणिवा व दोष दाखवितां येतील. सरकारी पंचांगाचा सर्वत्र प्रचार व्हावा ह्या प्रशंसनीय हेतूने कित्येक ज्योतिषांनीं आपलीं पंचांगें २३ अं. १५. क. ह्या अयनांशावर आधारलीं सुद्धां ह्याची दखल सरकारला आहे कीं नाहीं कोण जाणे. शिवाय सरकारी कामकाजांत ह्या नवीन कालदर्शिकेचा स्वीकार सरकार करणार कीं नाहीं, ह्याचा थांग सरकार लागूं देत नाहीं.

राष्ट्रैक्याच्या दृष्टीने पंचांगाच्या मूलभूत तत्त्वांसंबंधीं एकवाक्यता होणें अवश्य आहे. ह्यासाठीं अखिल भारतांतील पंचांगकर्त्यांची व ज्योतिर्विदांची परिषद भरविणें अवश्य आहे. ह्या गोष्टीकरतां सरकारवर अवलंबून न राहतां महाराष्ट्रांतल्या ज्योतिषांनीच पुढाकार घ्यावा. तसेंच प्रथम भारतांत अद्ययावत्-सुसज्ज अशी वेधशाळा स्थापण्याची आग्रहाची मागणी सरकारकडे करावी. दुसरी एक सूचना लोकांना न पटण्यासारखी कराविशी वाटते ती ही कीं, शक सुद्धां बदलावा. स्वातंत्र्यदिनापासून स्वातंत्र्य शक म्हणून सुरू करावा. पंचांगकर्त्यांनी पण लक्षांत ठेवावें कीं, लोकांचें हें अज्ञान तुम्हीं किती दिवस पोषीत बसणार ? अज्ञान घालविणें हें ज्ञात्याचें कर्तव्य नाह काय ? सर्व पंचांगकर्त्यांनी एकमताने पंचांगें करण्याचें ठरविल्यास आपल्या पंचांगाचा खप होणार नाहीं ही सबब राहणार नाहीं. दुसरी गोष्ट विचारांत घ्यावी. ह्या युगांत उदकुंभ कोण देतो ! दशाहाराचीं स्नानें कोण करतो ? आमच्या गांवांत दर्शाचा ब्राह्मण कोणीहि सांगत नाहीं. श्राद्ध-पक्षांनाहि लोकांनी फाटा दिला. पांच टक्के धर्माचार उरला नाहीं. आजकाल मुलाचें उपनयन करा असें सांगणेंहि कठीण झालें आहे. संध्या शिकवीत नाहींत;








गळ्यांत जानवें नाहीं. मग मुंजीचा उपयोग काय? चौलादि संस्कारांचीं प्रायश्चित्तें आपण सोडतों तद्वत् विवाहाच्या प्रसंगीं उपनयनांचें प्रायश्चित्त सोडण्याची वहिवाट लवकरच पडेल अशीं चिन्हें दिसत आहेत.

संक्रांती व ऋतु सायन पाहिजेत ह्यांत शंकाच नाहीं. ते त्याचप्रमाणें द्यावेत; मग कोणताहि महिना असो. विभागात्मक नक्षत्रावर श्रद्धा बसणार नाहीं. तारात्मक नक्षत्रेंच घ्यावीं. नक्षत्रें सारख्या अंतरावर नसतात हें खरें. तथापि तीं शास्त्रांत कशीं बसवितां येतील हें ज्योतिर्विदांना साधणार नाहीं असें नाहीं. पंचांग-कर्त्यांनी जरा धीट व्हावें म्हणजे झालें.

असो; धर्मनिर्णयमंडळाचे कार्यवाह श्री. कोकजे यांनी परिश्रमपूर्वक मोठ्या नेटाने व चिकाटीने तसेंच नामांकित ज्योतिषांचें साहाय्य संपादन करून हें भारतीय पंचांग प्रसिद्ध केलें ह्याबद्दल महाराष्ट्र त्यांना धन्यवाद देईल ह्यांत संशय नाहीं.

---

पं. लक्ष्मणशास्त्री ओगले

# ऋग्वेदांतील ऋत आणि सत्य

' ऋतम् ' यांत धातु ' ऋ ' – जाणें असा आहे. ऋतम् = गेलेलें, झालेलें. ' सत्यम् – सति जातं शुभं वो' अशी व्युत्पत्ति आहे. सायणांनीं ऋतचे संदर्भानें निरनिराळे ३०–३५ अर्थ केले आहेत. त्याची सूचि सोबत दिली आहे. ऋतचा अर्थ चाल, रीत, पद्धत असा करतां येईल; अद्यावधि जसें जें होत गेलें, अनुसरलें गेलें वा केलें गेलें व जात असे, त्याला ऋत म्हटलें जाई. थोडा इतिहासाचा विचार करूं.

## आर्य, मनुष्य, देव व ऋषि

आर्य हा शब्द ' ऋ-जाणें ' यापासून साधलेला आहे. याचा अर्थ फिरते-nomadic–असा करावा लागेल. आक्रांत अशा मूळच्या (द्राविड) सुस्थित, स्थिर लोकानीं आक्रमक लोकांना (द्राविडी) शब्द योजिला, व त्याचें गीर्वाण भाषांतर आर्य हा शब्द होय. ऋग्वेदामध्यें आर्य शब्द ३१ वेळा आलेला आहे. त्याचे अर्थ सायणांप्रमाणें (१–१०३ ३) आर्यम्= विद्वांसः स्तोतारः, (१–१३०–८) आर्यम्=अरणीयम्, सर्वैः गंतव्यम्, (१–१५६-५) आर्यम्= आगंतव्यम्, (२-११–१९) आर्येण=आर्यभावेन, (३-३४-९) आर्यम्=उत्तमम्, (४ ३०–१८) आर्या=आर्यस्वाभिमानौ, (५–३४-६) आर्यः= स्वामी, (७–३३-७) आर्याः=श्रेष्ठाः, (८-१०३-१) आर्यस्य=उत्तम वर्णस्य, (९–६३-५) आर्यम्= भद्रन्, (१०–३८–३) आर्यः = त्रैवार्णिकः, (१०–१३८-३) आर्यः=अभिज्ञः, इत्यादि अर्थ दिलेले आहेत. जे त्यांना आपल्या अंगीं विशेषगुण आहेत असें वाटतें, ते गुण व जित जे विशेषगुण जेत्यांच्या अंगी आरोपितात, असे दोनहि प्रकारचे गुण व स्थिति दर्शविणारे अर्थ सायणांनीं केले आहेत. आर्य याचा अर्थ आक्रमक वा भटक्ये असा मूलतः आहे.

मनुष्य शब्द ऋग्वेदांत ४३ वेळां आला आहे. १-५९-४ मध्यें सायणांनीं मनुष्यः=लौकिकः, वंदी असा केला आहे. बाकी सर्व ठिकाणीं प्रशस्त अर्थ लावलेला आहे.

देव आणि ऋषि यांचा विचार करूं. ' ऋष्–जाणें ' यापासून ऋषि शब्द बनला आहे. आरंभीं वसाहत करण्याकरितां ज्या जमातींतून कांहीं लोक निघाले, ती मनुष्यजमात होय. जे लोक निघत किंवा निघाले त्यांस ' ऋषि ' म्हणत. एकामागून एक असे चार पांच वेळां ऋषि गेल्याचा उल्लेख आहे. आरंभीं गेलेल्यांचा शोध करण्याकरितां जे जे जात, ते परत न जातां अरण्यांत वसाहत करून रहात असत. ज्या राज्यांत ते रहात असत, त्या राजाला कर म्हणून सुकृताचा सहावा भाग देत असत. या ऋषींबरोबर मनुष्यजमातींतील ज्या चालीरीति विशेषतः यज्ञाची चाल-आल्या, त्या सर्वांस ऋत हें नांव मिळालें. ' अनृताः ' म्हणजे जुन्या चालीरीति-विशेषतः यज्ञाचीचाल–न पाळणारे, असा अर्थ आला. पुढें पुढें यज्ञ हाच विशेष अर्थ समोर ठेवून भाष्यकारांनीं यज्ञाङ्गांचा अर्थ त्याला लावून दिला. मनावर उपनिषदांचा पगडा बसल्यामुळें उपनिषदनुकूल अर्थ लावण्यांत येऊं लागले. त्यांना चालीरीतींची-विशेषतः यज्ञाची पूर्ण वा चांगली माहिती असल्यामुळें व तत्कालीन विद्या त्यांचेजवळ असल्यामुळें ऋषि म्हणजे ' अतीन्द्रियार्थदर्शी ', ' सर्वस्य द्रष्टा ' असें होऊं शकलें. १०–६४–१४ मध्यें ऋषिवत् = पितृवत् असा अर्थ केलेला आहे. यज्ञांत मन्त्र व स्तोत्रें हीं कामें ऋषींकडेच असत.

देव- मनुष्यांच्या जमातींतून वसाहत करण्याकरितां बहुसंख्येनें अथवा जमावानें बाहेर पडलेल्यांना ' देव ' हें नांव प्राप्त झालें. अज्ञातस्थल ऋषींचा शोध करणें व सामर्थ्याचा उपयोग करून-जिंकून-वसाहत करणें, असा दुहेरी उद्देश या टोळ्यांचा असणें संभवनीय आहे. पहिल्या अर्थी ' दिव्-प्रकाशणें ' व दुसऱ्या अर्थी दिव्-जुगार खेळणें-युद्ध म्हणज द्यूतच होय– हे दोनहि



अनुक्रमणिका








अर्थ दर्शविणारा शब्द 'देव' हा आहे. हे देव मनुष्यांना व ऋषींना आपले पितर-पूर्वज-समजत. (४-१-१३) अस्माकमत्र पितरो मनुष्या अभि- प्रसेदुर्ऋतमाशुषाणा ॥ सायणभाष्यः—अत्र लोके पूर्व मनुष्याः अस्माकं पितरः अंगिरसः ऋतम् यज्ञम् आशुषाणाः अश्नुवानाः सन्तः इत्यादि. यावरून देव हे मनुष्य या मोठ्या समाजाचे घटक होते, हें निष्पन्न होतें. 'ऋत' व 'सत्य' याचे अर्थ 'झालेलें' व 'असललें' असे आहेत. भाष्यें फार उशिरां झालीं, फरकाचा लोप झाला व अनेक अनुमानार्थ उत्पन्न झाले. 'सत्य' याचा सायणांनीं 'विद्यमान' असाहि अर्थ केलेला आहे: 'ऋतं वच्मि सत्यं वच्मि'- झालेलें सांगेन, आहे तें सांगेन; 'ऋतं च सत्यं च'- झालेलें व आहे तें.

'ऋत' याला विरोधी शब्द 'अनृत' आहे परन्तु अनृत याचे दोन अर्थ होतात (१) न झालेलें (२) विद्यमान.

सत्य याला विरोधी शब्द 'असत्य' न वापरतों 'अनृत' च वापरलेला आहे. ऋग्वेदांत 'असत्याः' शब्द, व तोहि एकदांच भिन्न अर्थी ४ थ्या मण्डळांत आलेला आहे.

'सत्य'चा अर्थ उपनिषत्कालापूर्वी 'विद्यमान' (extant) एवढाच होता. त्रिकालाबाधित इत्यादि अर्थ नंतर उपनिषत्कालांत आले व त्याचा परिणाम भाष्यकारांवर. झाला. ऋग्वेदांत ऋत ५४२, अनृत २८, सत्य १८७ व असत्य १ वेळ आलेला आहे. ऋषींच्या स्तोत्रांत गत गोष्टींचा व त्या खालोखाल विद्यमानांचा उल्लेख आहे.

**सायणांनीं ऋत शब्दाच्या केलेल्या अर्थांची अल्प-सूचि**

१-२-८ ऋतेन।
अवश्यं भाविना सत्येन फलेन।

१-२३-५ ऋतस्य।
सत्यस्य प्रशस्तस्य।

१-४३-९ ऋतस्य।
उत्तमे स्थाने प्राप्तस्य।

१-६५-२ ऋतस्य।
गतस्य पलायितस्य अग्नेः यज्ञस्य अन्नस्य वा।

१-६८-२ ऋतम्।
अवितथम्।

१-६८-३ ऋतम्।
गतस्य देवयजनं वा प्राप्तस्य।

१-७१-३ ऋतम्।
देवयजनदेशं प्राप्तमग्निम्।

१-७५-५ ऋतम्।
सत्यं यथार्थफलं यज्ञं च।

१-७७-३ ऋतऽवा।
ऋतवान् यज्ञवान् सत्यवान्।

१-८४-१६ ऋतस्य।
गच्छतः इन्द्रसंबन्धिनः रथस्य।

१-१०५-४ ऋतम्।
भद्रं स्तोतृभ्यः कृतं श्रेयः।

१-१३२-३ ऋतस्य।
सत्यफलस्य यज्ञस्य।

१-१३३-१ ऋतेन।
यज्ञेन बलेन वा।

१-१३६-२ ऋतस्य।
गमनशीलस्य आदित्यस्य।

१-१४१-१ ऋतस्य।
यज्ञसाधकस्य अग्नेः।

१-१४४-७ ऋतजात।
यज्ञार्थमुत्पन्ना।

१-१४६-५ ऋतचित्।
यज्ञस्य उदकस्य वा चेतिता ज्ञाता।

१-१५२-३ ऋतम्।
सत्यम् जगतः प्रकाशगमनादिरूपम्।

१-१५२-१ ऋतेन।
फलेन तत्साधनेन यज्ञेन वा।

१-१६३-५ ऋतस्य।
सत्यभूतस्य यज्ञसाधनस्य अश्वस्य वा।

१-१६४-११ ऋतस्य।
उदकस्य सत्यात्मकस्य वा आदित्यस्य।

१-१६४-३७ ऋतस्य।
परमार्थस्य परस्य ब्रह्मणः।

१-१८०-३ ऋतप्सू।
सत्यस्वरूपौ॥






१–१८५–६ ऋतेन ।
यज्ञेन निमित्तभूतेन ।
१–१८५-१० ऋतम् ।
स्तोत्रम् ।
२– ११–१२ ऋतया ।
ऋतं कर्मफलं तत्कामनया ।
२–२४ ८ ऋतज्येन ।
सत्येन ।
२–२७–११ ऋतनिभ्यः ।
ऋतस्य यज्ञस्य सत्यस्य वा नेतृभ्यः ।
२–२८–४ ऋतम् ।
विचारणहेतुभूतं सत्यं यद्वा नदीनामुपादानभूत-मुदकम् ।
३–२-१३ ऋतऽवानम् ।
बलवन्तम् ।
३–४–७ ऋतम् ।
अग्निमेव ।
३–५-२ ऋतस्य ।
आदित्यस्य ।
३–६–१० ऋतजातस्य ।
जातसत्यस्य होतुः यज्ञस्य ।
३–७-८ ऋतम् ।
सत्यमेव अग्निम् ।
३–२७ ११ ऋतस्य ।
सत्यभूतस्य ज्योतिष्टोमादेः ।
३–६१–६ ऋतवरी ।
सत्यवती या इयम् उषा ।
३–६२-१८ ऋतऽवृधा ।
कर्मफलस्य ।
४–७–३ ऋतऽवानम् ।
अमायिनम् ।
४–१०–७ ऋतऽवः ।
सत्यवन् अग्ने ।
४–२३-८ ऋतस्य ।
इन्द्र आदित्य, सत्य यज्ञ ऋत देवस्य ।
४–४०–५ ऋतजाः ।
ऋतं सत्यं सर्वैर्द्दश्यत्वेन सत्यजातः, नहि असौ इन्द्रादिवत् परोक्षो भवति ।
४–५५–२ ऋतसत् ।
ब्रह्म । ।

४–५५-२ ऋतधीतयः ।
सत्यकर्माणः ।
५-५१–२ ऋतधीतयः ।
अबाध्यकर्माणः । सत्यस्तुतयः ।
५-४१–१ ऋतस्य ।
उत्पादकस्य अन्तरिक्षस्य ।
७–७५–१ ऋतेन ।
तेजसा ।
८–६–८ ऋतस्य ।
सोमात्मकस्य ।
८–१३-१९ ऋतयवः ।
यज्ञं कामयमानः ।
८–२५–३ ऋतवरी ।
सत्यवतीमाता देवमाता अदिती ।
८–२७-१९ ऋतम् ।
कल्याणभूतं गृहम् ।
९–२३–२ ऋतस्य ।
अमृतस्य ।
९–८६–३२ ऋतस्य ।
सत्यभूतस्य यजमानस्य ।
९–९७–२३ ऋतम् ।
सत्यभूतं आत्मीयं रसम् ।
१०–१२२–६ ऋतानि ।
सत्यभूतानि त्रीणि पृथिव्यादिस्थानानि ।
१०–१९०–१ ऋतम् ।
मानसं यथार्थं संकल्पनम् ।
३–२–१३ ऋतवानम् ।
( सायण ) बलवन्तम् ।
( दीपिका ) सत्यवन्तम् ।
( सूचितम् ) पूर्वस्मिन्काले यथा यत् कृतं तत् तथा जानन्तम् ।
३-४–७ ऋतम् ।
( सा. ) अग्निम् । ( सू. ) ( अग्नेः ) पूर्वं वा गतवृत्तं रीतिं वा ।
३–५–२ ऋतस्य पूर्वीः सदृशः चकानः ।
( सा. ) पूर्वीः बह्वीः ऋतस्य आदित्यस्य संदृशः दीप्तीः चकानः कामयमानः ।
( दी. ) अहर्मुखस्याः सत्यस्य संदृष्टीः चकानः ।
( सू. ) गतकालस्य गतकालीनाः पूर्वतराः ( पूर्व-तराभिः ) समदीप्तीः चकानः कामयमानः ।

३-६-१० तस्थतुः प्राची सुमेके ऋतावरी ऋतजातस्य सत्ये अध्वरेव ।

(सा.) ऋतजातस्य जातसत्यस्य होतुः सुमेके सुरूपे ऋतावरी उदकवत्यौ सत्ये सत्यस्वरूपे प्राची अनुकूले तस्थतुः तिष्ठतः अध्वरेव अध्वराविव यज्ञाविव ।

(दी.) उर्वी द्यावापृथिव्यौ वृधे प्रोत्साहनाय अध्वर्यू इव यज्ञवत्यौ यज्ञजातस्य ।

(सू.) यस्य ऋतजातस्य ऋतैः पूर्वकालीनैः यागादिभिः (करणेहेतौवातृ०) जातस्य उत्पन्नस्य प्रोत्साहितस्य वा होतुः द्यावाः पृथिव्यौ ऋतावरी ऋतानि आवृण्वाने अतिशयाने वा सुमेके सुरूपे सत्ये विद्यमाने प्राची (प्र + अञ्चति गच्छति) पुरःसरा अध्वरा (अध्वराति ददाति) मार्गदा इव तस्थतुः तिष्ठतः ।

१-७-३ ऋतावानं विचेतसम् ।

(सा.) अमायिनं विचेतसम् विशिष्टज्ञानम् ।

(दी.) सत्यम् सुमतिम् ।

(सू.) प्रतियज्ञं विद्यमानत्वाद् उपस्थितेर्वा अखिलवृत्तान्तविदितवन्तम् अतः विचेतसं विशेषेण (चित्-सम्यग्ज्ञाने) सम्यग्ज्ञानवन्तम् ।

४-१६-१० ऋतचित् ।

(सा.) सत्यदर्शनी ।

(दी.) ऋतचित् । नाम । इन्द्रस्य भार्या ।

(सू.) अद्यावधि संपादितेषु यज्ञेषु यद्यत् कृतं कर्तव्यं वा तत्सम्यक् जानन् ।

१-१९-७ ऋतज्ञाः ।

(सा.) अन्नस्यजनयित्री ।

(दी.) सत्यज्ञाः ।

(सू.) अद्यावधि अनुभवात् कर्तव्याकर्तव्ये जानन्त्यः ।

४-२३-८ ऋतस्य पूर्वीः शुरुधः सन्ति ।

(सा.) अत्र ऋतशब्देन इन्द्रो वा आदित्यो वा सत्यं वा यज्ञं वा उच्यते । ऋतस्य ऋतदेवस्य-संबन्धिन्यः पूर्वीः बहवः शुरुधः आपः सन्ति ।

(दी.) ऋतस्य हि सत्यस्य हि अस्य शोकस्य रोधयित्र्यः बहवः आपः सन्ति ।

(सू.) अद्यावधि संपादितानां यज्ञानां बहवः शोकस्य रोधयितारः श्लोकाः शब्दाः सन्ति । वा बहवः रुग्रोधिन्यः वनस्पतयः इव श्लोकाः सन्ति ।

४-२३-८ ऋतस्य धीतिर्वृजिनानि हन्ति ।

(सा.) ऋतस्य ऋतदेवस्य संबन्धिनी धीतिः प्रज्ञा तद्विषया स्तुतिर्वा वृजिनानि वर्जनीयानि पापानि हन्ति हिनस्ति ।

(दी.) ऋतस्य प्रज्ञा वर्जनीयानि हन्ति ।

(सू.) अद्यावधि संपादितानां यज्ञानां धीतिः ज्ञानं वृजिनानि अकरणीयानि हन्ति अपसारयति ज्ञापयति वा ।

४-२३-८ ऋतस्य श्लोको बधिराततर्द कर्णौ बुधानः शुचमान आयोः ।

(सा.) ऋतस्य ऋतदेवस्य सबन्धी श्लोकः स्तुतिरूपावाक् आयोः गन्तुः मनुष्यस्य सम्बन्धिनौ बधिरा बधिरौ प्रतिबद्धौ कर्णा कर्णौ ततर्द तृणत्ति । कीदृशः श्लोकः बुधानः बुध्यमान शुचमानः ।

(सू.) ऋतस्य अद्यावधि यज्ञीयः बुधानः बोधयमानः शुचमानः तेजस्वी अज्ञानहरः श्लोकः शब्दसमूहः स्तोत्ररूपः मन्त्ररूपो वा आयोः मनुष्यस्य बधिरा पिहितौ कर्णा कर्णौ ततर्द कर्णयोः पिधानं आवरणं वा तृणत्ति अपसारयति । उत्पथिनं मार्गं सूचयन्ति कथयन्ति ।

५-८-१ ऋतयवः ।

(सा.) यज्ञकामाः ऋषयः ।

(दी.) यज्ञं इच्छमानाः ।

(सू.) ऋतं अनुसरन्तः (युधातोः अर्थविस्तारेण) अद्यावधि यथा यत् आचरितं तथा तत् आचरणे बद्धाः निगडिताः ।

५-४१-१ ऋतस्य सदसि ।

(सा.) उत्पादकस्य अन्तरिक्षस्य सदसि ।

(दी.) सत्यस्य स्थाने । अकौटिल्ये वर्तमानान् । तेन प्रीतौ वा ।

(सू.) यज्ञगृहे- स्थाने वा । तद्धेतुत्वात्ताच्छब्द्यम् ।

६-३९-२ ऋतधीतिभिः ऋतयुग्युजानः ।

(सा.) ऋतधीतिभिः सत्यकर्मभिः अङ्गिरोभिः युजानः संगच्छमानः ऋतयुक् ऋतेन तत्कृतेन स्तोत्रेण युक्तश्च भूत्वा ।

(दी.) ऋतधीतिभिः सत्यकर्मभिः अङ्गिरोभिः युज्यमानः ।

(सू.) ऋतधीतिभिः गतानुभवशनैः ऋत-युक् स्तोत्रैः यज्ञेषु पठितैः स्तोत्र-ऋग्भिः युक्तः सहितः वा ताः ऋचः स्तोत्राणि वा युञ्जानः वा यज्ञीया योजनाः युजानः युञ्जानः ।

७-६६-१३ ऋतावानः ऋतजाता ऋतावृधो अनृत-द्विषः ।

(सा.) ऋतावानः ऋतवन्तो यज्ञवन्तः उदकवन्तो वा । ऋत + जाताः । उक्त ऋत शब्दार्थः तदर्थमुत्पन्नाः । अथवा ऋतात् प्रजापतेः सकाशात् उत्पन्नाः । ऋतावृधः उक्तार्थस्य ऋतस्य वर्धयितारः । अनृतद्विषः अयष्टृद्वेष्टारः ।

(दी.) ऋतावानः । सत्यवन्तः । सत्याज्जाताः सत्यस्य वर्धयितारः । अनृतस्य द्रोग्धारः ।

(सू.) पुरा यथा यत्कृतं तथा तत् जानन्तः यत् परंपरया प्राप्तं तत् लोकरीतिं वा जानन्तः ऋतजाताः पारंपर्यस्य रक्षणाय अनुसरणाय एव जाताः उत्पन्नाः ऋतावृधः पारंपर्यं आचरणेन वर्धयन्तः अनृतद्विषः अनृतत्वं पारंपर्यरहितत्वं– विपरीतत्वम्– विरुद्धत्वं द्वेष्टारः द्विषन्तः ।

८-२७-१९ ऋतं दध ।

(सा.) कल्याणभूतं गृहं धारयत ।

(सू.) परंपरया प्राप्तं यज्ञानुष्ठानं कुरुत ।

१०-१०-४ ऋतावदन्तः अनृतं रपेम ।

(सा.) ऋतानि सत्यानि वदन्तः अनृतं असत्यं वदेम ।

(सू.) ऋताऋतानि यानि यथा भूतानि तानि तथा वदन्तः कथनशीलाः अनृतं यत् न भूतम् वा यत् यथा भूतं तत् अन्यथा अभूतं वा इति रपेम वदेम ।

२-१५-१ अस्य महतः सत्यस्य ।

(सा.) अस्य महतः बलवतः सत्यस्य सत्यसंकल्पस्य ।

(दी.) ,, ,, ,, ,, अमायिनः ।

(सू.) ,, ,, ,, ,, विद्यमानस्य ।

१-१५-५ क्व ऋतं क्वदनृतम् ।

(सा.) वः युष्माकं संबन्धि स्तोतृविषयं ऋतं सत्यं कस्मिन् देशे वर्तते । अनृतं द्वेष्टृविषयं असत्यं च क्व कुत्र गतम् ।

(दी.) क्व वः गतं आनृशंस्यम् क्व वा शाठ्यं अयजमानविषयम् ।

(सू.) क्व युष्माकं प्राक् ऋतं यज्ञादि अनुष्ठानं रीतिर्वा क्व च अनृतं विद्यमानं अनुष्ठानम् । बहुलं भिन्नमार्गत्वं दृश्यते इति अर्थः ।

१-१५२-१ अवातिरतमनृतानि विश्वा ऋतेन सचेथे ।

(सा.) विश्वानि सर्वाणि अनृतानि असत्यानि पापानि अवातिरतम् नाशयतम् । ऋतेन फलेन तत्साधनेन यज्ञेन वा सचेथे संगच्छेथे ।

(दी.) सर्वाणि च अनृतानि वृत्रस्य तेजसा विनाशय । सत्येन प्रकाशमानौ संगच्छेथे ।

(सू.) विश्वानि सर्वाणि अनृतानि परंपरागत-मार्गात् भिन्नानि विपरीतानि अस्माकं कर्माणि अवातिरतम् नाशयतम् त्यजतम् । ऋतेन परंपरा-गतमार्गानुकूलेन कर्मणा सचेथे संगच्छेथे स्वीकुरुतम् इति ।

४-५-५ अनृताः असत्याः ।

(सा.) अनृताः मानससत्यरहिताः असत्याः वाचिकसत्यरहिताः ।

(दी.) अनृताः अनृतयुक्ताः वाचिकमनृतमसत्यं एवं विधाः ।

(सू.) अनृताः पुराणमार्गं त्यजन्तः असत्याः सत्सु विद्यमानेषु स्वीकृतेषु (मार्गेषु) अपि अशुभाः शोभनया न आचरन्तः ।

३-४-७ ऋतं शंसन्तः ऋतमित्त आहुः ।

(सा.) ऋतमुदकं शंसन्तः ऋत्विजः ऋतमित् अग्निमेव आहुः ।

(दी.) सत्यमनयोः स्तोत्रम् । शंसन्तः । सत्यम् । एव । ते वदन्ति ।

(सू.) ऋतं गतं पूर्वकालीनं यत् ते ऋत्विजः शंसन्ति वदन्ति स्तोत्रेण तत् तद्ततः न किंचिदपि न्यूनम् अधिकं वा ।

---

श्री. हेमकांत व्यंकटेश बलकुंदी

# सामाजिक परिवर्तनाचें तत्त्वज्ञान ( पूर्वार्ध )

## — पाश्चात्यांचा दृष्टिकोण

समाजामध्यें प्रतिदिनीं बदल होत असल्याचें आपणा सर्वांच्या प्रत्ययाला नेहमींच येतें. द्वितीय महायुद्धाच्या पूर्वीचा काळ आताच्या मानानें बरा होता किंवा ब्रिटिश राजवट ही सद्य:स्थितिपेक्षा बरी होती असेहि वैफल्यपूर्ण उद्‌गार काढलेले पुष्कळदा ऐकूं येतात. धर्म बुडाला, जातिव्यवस्था नाहीशी होत चालली, व्यवसाय व तज्जन्य प्रतिष्ठा ही जन्मसापेक्ष न राहतां शिक्षण व चढाओढ यांच्याद्वारें प्राप्त करून घेतां येते, गुणी व विद्वान् लोक पूज्य न मानले जातां श्रीमंत लोकांनाच समाजांत जास्त प्रतिष्ठा मिळते असे निरनिराळे प्रकार अवलोकन केल्यावर समाजांत व सामाजिक मूल्यांत घडून येणाऱ्या बदलाचें स्वरूप, त्याची गति, व त्या बदलापासून संभावणाऱ्या भल्याबुऱ्या परिणामाबद्दल एक प्रकारचें कुतूहल वाटूं लागतें. भूतकाळांत घडून गेलेल्या सामाजिक स्थित्यंतराविषयीं विचार करतांना आपला समाज आजपासून एक हजार वा दहा हजार वर्षांनंतर कशा अवस्थेंत राहील असा विचारहि एखाद्या व्यक्तीला सुचणें अगदीं साहजिक आहे. या धर्तीचें सामाजिक कल्पनारंजन ( social speculation ) पुष्कळ शतकांपूर्वीहि समाजांत प्रचलित होतें. सामाजिक स्थित्यंतराबद्दल विचार करतांना जी गोष्ट प्रकर्षानें नजरेत भरते ती म्हणजे अभ्यासविषयाची अस्थिरता. इतर सामाजिक विषयापेक्षां समाजांतील घटकांच्या परस्परसंबंधसमुदयात्मक समाजरचना ( social structure ) ही शीघ्रतर परिवर्तनीय असल्यानें तिच्या अभ्यासकांना इतिहासावर अवलंबून राहणें जितकें अनिवार्य आहे तितकेंच संदेहास्पदहि आहे. इतर विषयाच्या अभ्यासकांनीं— मग ते खगोलशास्त्रज्ञ, रसायनशास्त्रज्ञ वा प्राणिशास्त्रज्ञ असोत – ऐतिहासिक काळीं ज्या वेळेला आपल्या विषयविशेषाचें अध्ययन सुरू केलें तेव्हांपासून ते आजतागायत त्यांच्या विषयांतील अभ्यासक्षेत्रांत सातत्याचा लाभ त्यांना घडत आला. परंतु समाजशास्त्र ज्या समाजरचनेचें वा इतर समाजशास्त्रांतर्गत विषयखंडाचें अध्ययन करतें त्यांत तें अभ्यासाधीन असतांनाहि परिवर्तन होत असल्यानें अभ्यास करण्याची पद्धति व त्या अभ्यासांतून निष्पन्न होणारें फल या दोन्हींतहि सतत बदल होत असतो. यामुळें समाजशास्त्र हें आपल्या विषयासंबंधीं, गुरुत्वाकर्षण सिद्धांत व इतर एखाद्या गणितांतील सिद्धांत यासारखे, निश्चित व सुलभ सिद्धांत प्रचलित करूं शकत नाहीं; पण त्याबाबतींत कांहीं तत्त्वांचा बोध करून देऊं शकतें.

वरील उपपादनावरून समाजशास्त्राचा समाज व त्यांत सतत होणारे बदल वा परिवर्तन ( social change ) याबाबतींत एक निश्चित अभ्यासकोन हें सहजच लक्षांत येईल. मानवांनीं स्वप्रयत्नानें जीवनपरिसरांत घडवून आणलेले बदल, माणसांचीं मतें व त्यांच्या श्रद्धा आणि मानवाच्या अधीन नसलेल्या जीवशास्त्रीय व भौतिक घटनांमुळें होणारे जीवनांतील बदल या विविध सूत्रांनीं ग्रथित होणाऱ्या प्रक्रियेला समाजशास्त्रांत सामाजिक परिवर्तन ( Social change ) अशी संज्ञा आहे. या परिवर्तनाचा अभ्यास करण्यांत समाजशास्त्राची मूलभूत धारणा अशी आहे कीं समाजाचें अस्तित्व हें एक कालिक – अनुक्रम ( time – sequence ) या स्वरूपांत जाणवतें. हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे समाज हा अतिशय अस्थिर असतो व त्याला स्थिर व स्थायी स्वरूप नसतें. समाज ही एक सुसंबद्ध संगति वा प्रक्रिया आहे; पण तो ( कोणत्याहि प्रक्रियेचा ) परिणाम ( Product ) नाहीं. ही प्रक्रिया कालवश








झाली कीं, तिचा परिणाम अदृश्य होतो.[१] या विवेचनाचें स्पष्टीकरण करतांना असें म्हणतां येईल कीं एखाद्या यंत्रांतून निघालेली वस्तु, तें यंत्र संपूर्णपणें मोडून टाकल्यावरसुद्धा, स्वतंत्रपणें अस्तित्वांत राहूं शकते. त्याचप्रमाणें एखादा डोंगर निर्माण करणारी भौगोलिक शक्ति नष्ट झाली तरी तो डोंगर शतकानुशतकें पृथ्वीच्या पाठीवर उभा असतो. या उदाहरणावरून असें दिसेल कीं एखादा परिणाम ( Product ) घडवून आणणारी संगतवार क्रमपद्धति ( Process ) नाहीशी जरी झाली तरी तिचा विपाक शिल्लक राहतो; किंवा परिणाम हा प्रक्रियेपासून विलग करता येणें शक्य असतें. परंतु वैदिक काळांतील वर्णव्यवस्था वा ऐतिहासिक काळांतील सतीची चाल यासारखे त्या काळच्या समाजाचे — म्हणजे त्या समाजांतील घटकांचे परस्परसंबंधस्वरूपात्मक प्रक्रियेचे – परिणाम हे आज अवशेषरूपानेसुद्धां अस्तित्वांत नाहीत; कारण त्या प्रक्रियेचे घटक – तत्कालीन समाजांतील लोक – नाहीसे झाल्यावर ती वर्णव्यवस्था वा ती चाल ही त्यांच्याबरोबरच नष्ट झाली. यावरून सामाजिक प्रक्रिया व तिचे परिणाम हे सहजीवि असतात असें आढळून येतें, याचें कारण वर्णव्यवस्था किंवा एखादी चाल वा लोकाचार हे एक समाजांतर्गत कार्यपद्धतीच्या ( mode of activity ) स्वरूपांत अस्तित्वांत येतात व त्यांचें जीवन त्या समाजांतील घटकांच्या मनांत साकार होतें.

या शेवटल्या विधानावर एक शंका सहज सुचते. महाकवि कालिदासाच्या काळची समाजाची घटना जरी आज नष्ट झालेली दिसते तरी त्या घटनेच्या चौकटीतच तयार झालेलें त्याचें काव्य भारतवर्षाचा एक थोर सांस्कृतिक वारसा मानलें जातें. या शंकेच्या निरसनासाठीं असें उत्तर देतां येईल कीं समाजशास्त्र हें समाजरचना ( social structure ) व इतर समाजशास्त्रीय विषय यांचा अभ्यास व त्या समाजाच्या संस्कृतीचा अभ्यास या दोन्हींत मूलभूत स्वरूपाचा फरक करतें. संस्कृति ही तिच्या भावमय व वस्तुमय अशा दोन विभागापैकीं वस्तुमय ( material ) अंगामुळें दीर्घजीवि होतें तर समाज हा तत्कालीन समाजघटकांच्या परस्परसंबंधसमुदयरूपानें अस्तित्वांत येतो व त्याच्या इतकाच सहजीवि ठरतो. या फरकामुळें सामाजिक परिवर्तन हें सांस्कृतिक फेरबदलापासून नुसतेंच भिन्नत्व पावतें व कमी व्यापक ठरतें असें नसून तें समाजाच्या सांस्कृतिक इतिहासांत एक भागमात्र ठरतें.

वर उल्लेख केलेलाच आहे कीं समाजांतर्गत परिवर्तनाची कल्पना बरीच जुनी आहे. वर्तमानस्थितिपेक्षा चांगली वा वांछनीय अशी स्थिति अस्तित्वांत आणणें वा निर्माण करतां येणें शक्य होईल ही कल्पना मानवी इतिहासांत बरीच पुरातन-कदाचित् मानवसमाजाबरोबरच उत्पन्न झालेली– आहे. समाज हा प्रगतिशील आहे ही भावना जरी या औद्योगिक क्रांतीच्या काळापासून प्रकर्षानें जाणवत असली तरी भूतकाळांतहि तिचें अस्तित्व जाणवत होतें. कांहीं वेळेला ही कल्पना समाजांत थेट उलट स्वरूपांत - विशेषेंकरून वृद्ध मंडळींत– प्रचलित असलेली दिसते. सत्ययुगापेक्षा कलियुग हें धर्माचरणांत भ्रष्ट आहे असें म्हणणें हें याचें उदाहरण समजतां येईल. परंतु किंचित् आश्चर्य वाटण्याजोगी वस्तुस्थिति अशी आहे कीं मानवी संस्कृतींत प्राचीन काळीं जरी इतकीं प्रचंड परिवर्तनें झालीं असलीं तरी त्यांच्यापाठीमागे जवळजवळ मध्ययुगापर्यंत तरी कोणतेंच निश्चित स्वरूपाचें सामाजिक प्रगतीचें तत्त्वज्ञान नव्हतें. अक्षरज्ञानपूर्व समाजांत ( prelite society ) बौद्धिक विकलावस्थेमुळें अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाचा उदय अशक्यप्राय होता. पूर्वेकडील प्राचीन समाजांतहि गतानुगतिकतेच्या प्रभावामुळें प्रगतिवादाला वावच नव्हता. या कल्पनेचा व तद्भव तत्त्वज्ञानाचा इतिहास तपासून पाहणें मनोरंजक ठरेल.

## परिवर्तनांचा परिणाम सामाजिक प्रगति

आधुनिक समाज हा आदिकालीन लोकपुंज ( primitivetribe ) वा प्राचीन समाजखंड ( ancient

१. Society exists only as a time sequence. It is a becoming; not a being; a process, not a product. In other words, as soon as the process ceases, the product disappears. — From "Society" by R. M. McIver and C. H. Page 1957 p. 511. All references are to this edition.











community ) या दोन्हींपेक्षा जास्त प्रगत आहे ही विचारसरणी पाश्चात्यांच्या सामाजिक इतिहासांत तेराव्या शतकापासून उदय पावलेली दिसते. या शतकाच्या मध्यकालांत राहणाऱ्या राजर बेकन या गृहस्थाने सामाजिक प्रगतीचें त्याला पडलेलें दिवास्वप्न शब्दांत उतरवलेलें आढळतें. तरीपण सामाजिक प्रगतीच्या सिद्धांताचा पाठपुरावा करून त्याला तत्त्वज्ञानाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न १७ व्या वा १८ व्या शतकांतच मोठ्या प्रमाणावर केलेला आढळतो. अशा प्रकारच्या प्रयत्नांच्या मागें असणारीं दोन कारणें सहजत्र सुचतात. त्यापैकीं पहिलें हें की आधुनिक विज्ञानाचा झालेला उदय व त्याच्या उपयोगामुळें मानवी समाजाला जास्त सुखी करतां येण्याची शक्यता मानवाला दिवसेंदिवस जास्त कार्यशील करूं लागली. दुसरें कारण असें कीं वाहतुकीच्या-विशेषतः समुद्रमार्गें होणाऱ्या वाहतुकीच्या - साधनांमध्यें झालेल्या प्रचंड बदलामुळें युरोपांतील लोकांचा इतर भूखंडांतील विविधरीतीनें प्रगत झालेल्या निरनिराळ्या जमातींशी व समाजांशीं संबंध येऊन युरोपखंडांतील विचारवंतांना आदिमानवकालांतील जमातीपासून ते थेट त्यांच्या सभोवतालच्या अद्यतन समाजापर्यंतच्या निरनिराळ्या सामाजिक अवस्थांचीं प्रात्यक्षिकें पाहावयास मिळाल्यामुळें सामाजिक प्रगतीच्या कल्पनेनें मूर्त स्वरूप धारण केलें. अठराव्या शतकांत प्रचलित असलेल्या उदारमतवादी मानवतावादामुळें औद्योगिकक्रांतिप्रवण समाजांतील दोषांची जाणीव लोकांना तीव्रतर स्वरूपांत होऊं लागली व त्यामुळें हे दोष समाजांतून काढून टाकण्याची खटपट जितक्या धडाडीने सुरू झाली तितक्याच उत्साहाने सामाजिक प्रगतीच्या कल्पनांना सैद्धान्तिक स्वरूप देण्याची खटपट सुरू झाली. अशा रीतीने प्रयत्नशील असलेल्या लोकांत, मॉंटेन, फ्रॅन्सिस बंकन व डेकार्टे यांचा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल. या तिघांत बंकनचें कार्य विशेषेंकरून डोळ्यांत भरतें याचें कारण त्याने आपल्या पूर्वजानांच सर्वज्ञ व आदर्श समजून त्यांच्या तुलनेने आधुनिक काळांतील समाजस्थितीला हीन व भ्रष्ट लेखण्याच्या प्रवृत्तीचा प्रथमतः विरोध केला. त्याकाळीं व तत्पूर्वीहि युरोपखंडांतील अक्षरवाङ्मयांत व ज्यू लोकांच्या धर्मग्रंथांतून मानवी इतिहासांतील सुवर्णयुग हें इतिहासजमा झाल्याचें मतच प्रामुख्यानें मांडण्यांत येत होतें. कांहीं ग्रंथांतून-उदाहरणार्थ सोफोक्लीसच्या प्रॉमिप्यूसमध्ये वा लुक्रेशिअसच्या ग्रंथांतून- सामाजिक प्रगतीच्या कांही कल्पना मांडण्यांत आल्याचें आढळतें. विशेषतः लुक्रेशिअस हा ग्रंथकार तर सामाजिक उत्क्रांतीच्या शोधासन्निध पोचला होता व त्याने प्रगति व विकास या दोन्हींतील भेदांकडेहि लक्ष दिलेलें होतें.[२] परंतु मध्ययुगामध्यें धर्माचा पगडा समाजावर बसूं लागला व मानवाचें विधिलिखित व मानवजातीचें भवितव्य या विषयांच्या खिश्चन धर्मपुरस्कृत कल्पनांच्या प्रभावांमुळें सामाजिक प्रगतीच्या तत्वज्ञानाच्या प्रसाराला पायबंद बसला. अठराव्या शतकांत सामाजिक प्रगतीच्या तत्वज्ञानाच्या निरनिराळ्या अभ्यासकोनांच्या विकासाला हातभार लावण्याची यादी बरीच मोठी होईल.[३] या निरनिराळ्या तत्वज्ञान्यांच्या कल्पनारंजनात्मक विचारांनी समृद्ध झालेला सामाजिक प्रगतीच्या तत्वज्ञानाचा वारसा समाजशास्त्र या नवजात ( इसवी सन १८३७

---

२. McIver and Page " Society " P. 619.

३. Barues and Becker, in their book, " Social thought from lore to science, " have given a long list of names of 18th century philosophers who contributed to the development of the various aspects of the theory of progress. These include, the French Philosophers like Foutenelle, Perrault, Turgot, Condorect, the Italalian Vico, the Englishman Godwin and the German Philosopher Immanuel Kant. Philosophers of Romanticism like Herder, Debonald, De Maistre and Van Holler could also be mentioned in this connection. The German philosopher, Hegel, was notable for his theory of " Dialectic of Development " which was later on taken up by Karl Marx.








मध्ये उद्भूत झालेल्या ) ज्ञानशाखेच्या स्वाधीन करण्यांत आला.

प्राचीन काळच्या समाजापेक्षा आजचें समाजजीवन जास्त प्रगत व विज्ञानाने भौतिक व तांत्रिक क्षेत्रांत घडवून आणलेल्या सुखसोयींच्या समृद्धीने जास्त सुखी आहे ही कल्पना प्रथमदर्शनी इतकी सोपी व आकर्षक वाटते कीं तिच्याबद्दल दुमत होऊ शकतें असें विधान केल्यास तें आश्चर्यकारक वाटेल. प्रगतीची कल्पना, प्रत्येक व्यक्तीचे विचार व त्याच्या इच्छा, यांना अनुसरून निरनिराळी असूं शकते. तरीपण एकोणिसाव्या शतकांत या कल्पनेची शास्त्रीय दृष्टिकोनांतून जेव्हा समाजशास्त्रज्ञ चिकित्सा करूं लागले तेव्हां त्यांच्यासमोर न्यूटन, गॅलिलिओ व इतर, विज्ञानक्षेत्रांतील संशोधकांचा आदर्श होता. पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र या ज्ञानक्षेत्रांत संशोधकांनी मिळविलेल्या झगझगीत यशाच्या मानाने त्या काळचें सामाजिक तत्वज्ञान–ज्याची संभावना सामाजिक कल्पनारंजन या शब्दांनीच केलेली बरी–हें अगदीच फिकें भासूं लागलें. समाजजीवनाच्या बहुविध अंगांचा विचार करणाऱ्या इतर सामाजिक शास्त्रांतहि विज्ञानाच्या कार्यपद्धतीचें अनुकरण करावें असा विचारप्रवाह सुरू झाला. विज्ञानाची महति जर का त्यानें प्रचलित केलेल्या सुसंबद्ध व सार्वत्रिक (smiple and universally applicable ) सिद्धांतान्वयें सिद्ध होतें तर समाजशास्त्रानेहि त्याचें अनुकरण कां करूं नये हा विचार साहजिकच प्राबल्य पावूं लागला. सामाजिक प्रगतीच्या कल्पनांना शास्त्रीयतेचा उजळा देण्याचें पद्धतशीर प्रयत्न सुरू झाले.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर – म्हणजेच १८५९ सालीं डार्विनचा " जीवजातींची उत्पत्ति " हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. तेव्हापासून त्यांतील उत्क्रांतीची वा विकासक्रमाची कल्पना व सामाजिक प्रगतीची कल्पना यांचें साहचर्य सुरू झालें व विकास म्हणजेच प्रगति या विचाराने मूळ धरलें. नैसर्गिक निवडीच्या तत्वाचा ( The Principle of Natural Selection ) अर्थ समाजांतील तत्कालीन घडामोडींना अनुकूल असा लावण्यांत आला व औद्योगिक क्रांतीमुळें घडून येणारे जलद परंतु गंभीर परिणामी फेरबदलांकडे ते सामाजिक प्रगतींतील एक टप्पा आहेत अशा विचाराने बघण्याचा सराव समाजशास्त्रज्ञांना पडूं लागला. या विचारापासून समाजशास्त्राच्या जनकत्वाचा बहुमान ज्याला देण्यांत येतो तो ऑगस्ट कॉम्टे किंवा त्याचे तत्कालीन शिष्यहि सुटले नाहींत. या मताला हर्बर्ट स्पेन्सरच्या लेखांनी चांगलीच पुष्टी मिळाली. अमेरिकन समाजशास्त्रज्ञांपैकी लिस्टर वार्ड व गिडिंग्ज यांच्याहि लेखनांतून याच मतांचा पडसाद ऐकूं येतो. हॉब्हाउसच्या लिखाणांतहि सामाजिक विकासाची (Social development ) व्याख्या अशा प्रकाराने करण्यांत आली आहे कीं तिच्यांत विकास व प्रगति या दोन कल्पनांच्या स्वरूपाबद्दल त्याच्या मनांत गोंधळ निर्माण झालेला असावा अशी शंका वाचकांच्या मनाला चाटून जाते.[४] स्थानमहात्म्याचा या विचारावर होणारा परिणाम पाहिला तर असें आढळतें कीं अठराव्या शतकांत युरोपियन लोकांना सामाजिक व धार्मिक परंपरेच्या जबर पकडीतून व सत्ताधीशांच्या जुलुमापासून सुटका करून घेणें यांत " प्रगति " प्रतीत होत होती तर एकोणिसाव्या शतकांतील अमेरिकन समाजाला त्या खंडावरील क्षेत्रव्याप्ती व नैसर्गिक साधनांचा विपुल विनियोग या दोन्हींच्या सतत वाढींत " प्रगतीचा " प्रत्यय येत होता. प्रगतीच्या या विविध कल्पनांकडे पाहतां तिची व्याख्या करणें किती कठीण आहे याची प्रचीति येत. प्रगतीच्या विचाराबरोबर ज्या मार्गानें वाटचाल करावयाची तो मार्ग व ज्या आदर्शाकडे गतिमान व्हावयाचें तें ध्येय या दोन्हींचाहि निकट संबंध आहे. या विचारांतील मार्गांची व ध्येयांची अनेकता ही वैचित्र्यपूर्ण व मनोरंजक जरी वाटली तरी शास्त्रीय चिकित्सेत ती निष्फलदायी ठरते. म्हणूनच प्रगतीची कल्पना ही शास्त्रोक्तरीत्या व्याख्याबद्धतेच्या कक्षातीत आहे असें म्हणण्यास कांही प्रत्यवाय नाही व तिची व्याख्या करावयाचीच असल्यास तरतमभावाचा म्हणजेच अस्पष्टरूपाने नैतिक अधिष्ठानाचा आसरा घेतल्याशिवाय गति नाही अशी जाणीव होते. निर्नैतिक दृष्टीनेच प्रगतीची व्याख्या करण्याचे दोन मार्ग संभवतात. अर्थातच ते

४. From " Society " by McIver and Page p. 610.



अनुक्रमणिका








दोनहि सदोष आहेत. एकतर प्रगतीचीं निर्णायक गमकें हीं व्यक्तिनिष्ठ आहेत असें मान्य करून तिच्या व्याख्येवर आत्मनिष्ठेची मर्यादा घालणें. दुसऱ्यापक्षीं मानवजातीचा स्वभाव, आकांक्षा व कार्यशक्ति यांचें सार्वदेशिक साधर्म्य व एकता प्रतिपादणारें तत्व मान्य करून ऐहिक वस्तु व त्यांचे उपभोग या भौतिक साधनसंपुटीवर आधारित प्रगतिमापनाचें एक वस्तुनिष्ठ मूल्य वा अनेक मूल्यें प्रचलित करणें. या दुसऱ्या मार्गांतील संभाव्य अडचणींचा विचार करतां तशी खटपट करणें किती कष्टाचें व जिकिरीचें होईल याची सहजच कल्पना येईल. हे दोनहि निर्नैतिक मार्ग त्याज्य ठरवून नैतिक अधिष्ठान समाविष्ट असलेल्या मापन–साधनाचा विचार करावयाचा म्हटल्यास, एखाद्या सामाजिक विषयाचा अभ्यास करणाऱ्या शास्त्राने तत्कालीन समाजांतील नैतिक मूल्यांनी कितपत प्रभावित व्हावें हा मूलभूत प्रश्न उपस्थित होतो. या प्रश्नाच्या उत्तरादाखल असें म्हणतां येईल कीं नैतिक मूल्यांचा उपयोग एक मापन-साधनाच्या स्वरूपांत करणें शास्त्रीयदृष्ट्या अयोग्य ठरेल परंतु याचा अर्थ सामाजिक शास्त्रांनी नैतिक मूल्यांना अभ्यासविषय समजू नये असा करणें अर्थातच अयोग्य होईल; मात्र या मूल्यांचा समाजांतील लोकमान्य सत्यें या स्वरूपांत विचार करतांना अभ्यासकाने आपल्या व्यक्तिगत नैतिक कल्पना बाजूला सारणे हें आवश्यक आहे.[५] या अडचणींच्या सांगोपांग विचारांतीं समाजशास्त्रज्ञांनी सामाजिक प्रगतीची कल्पना ही, शास्त्रीय दृष्टिकोणांतून पाहतां, एक अनभ्यसनीय व त्याज्य कल्पना ठरवली. समाजांतील स्थित्यंतरांचा विचार करण्यासाठीं ते इतःपर सामाजिक परिवर्तन ( social change ) हा शब्दप्रयोग वापरू लागले कारण परिवर्तनाच्या कल्पनेंत नुसतीच गतिनिदर्शकता आहे, पण प्रगतीची कल्पना नाहीं.

## परिवर्तन आणि विकास यांची सांगड

विकासवादाचा उदय डार्विनने आपल्या " जीवजातींची उत्पत्ति " या पुस्तकांत त्याचा जीवशास्त्रांत यशस्वीरीत्या उपयोग करून दाखवल्यापासून झाला असें मानण्यांत येतें. पृथ्वीवर निरनिराळ्या जातींच्या सामान्य स्वरुपाच्या पूर्वजापासून रूपांतर पावत पावत ज्या अनेक प्रकारच्या संकीर्ण अशा वनस्पतींची व प्राण्यांची निरनिराळ्या प्रकारची व जातींची उत्पत्ति झाली त्या क्रियेस जीवशास्त्रामध्यें विकासक्रिया म्हणतात. अर्वाचीन जीवशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं आजच्या सर्व प्राणिज कोटी ह्या एका मूळच्या अतिशय सूक्ष्म अशा एकपेशीय सेंद्रिय रचनेपासून उत्पन्न झालेल्या आहेत व त्यांच्या अनेक निरनिराळ्या शाखा ज्या आहेत त्यांच्या शारीरिक रचनामध्यें व क्रियामध्यें कोट्यवधि वर्षांत अनेक प्रकारचे फरक होऊन कोट्यवधि वनस्पतींच्या व प्राण्यांच्या आज आपणास आढळणाऱ्या जाती उत्पन्न झाल्या आहेत.[६] या विकासक्रमाचा गाभा म्हणजे भिन्नत्वकारक परिणतीचें तत्व होय. ज्या क्रमपद्धतीमुळें एखाद्या सेंद्रिय रचनाप्रकारांतील सुप्त वा अंकुरित गुणविशेष हे स्पष्ट व विविध स्वरूप धारण करून नवीन व जटिल रचनेत परिणत होतात ती क्रमपद्धति म्हणजेच भिन्नत्वकारक परिणति ( Differentiation ) होय. हें जीवशास्त्रीय तत्त्व समाजांत घडून येणाऱ्या फेरबदलांनाहि लावतां येणें शक्य आहे व तसें करणें उपयोगी ठरेल हा विचार तत्कालीन विचारवंतांना मान्य होऊं लागला होता. समाज वा त्यांतील निरनिराळे परस्परसंबंधात्मक रचनाप्रकार हे एखाद्या जातिविशेषांतील सेंद्रिय रचनेप्रमाणेच विकासक्रमाच्या निरनिराळ्या अवस्थांतून गेले असावेत हा विचार पुष्कळांना सुचला होता. विकासवादाच्या प्रसाराला सुरुवातीला कितीहि विरोध झाला असला तरी एक काळ असा येऊन गेला कीं जेव्हां विकासवादाच्या तत्वज्ञानांत हर्बर्ट स्पेन्सर, वार्ड व गिडिंग्ज यांनी अतिसुलभ व अतिव्याप्त सिद्धांत मांडण्यास आरंभ केल्याने जीवशास्त्रीय सिद्धांतांची सामाजिक तत्त्वज्ञानावरची पकड वाढू लागली व कालांतरानें सामाजिक शास्त्रांचें जीविशास्त्रीकरण होतें ( Biologization of social sciences ) कीं काय अशी शंका पुष्कळशा तत्वज्ञांनी लोकांना येऊं लागली. अर्थातच या विचारप्रवाहाविरुद्ध प्रतिक्रिया निर्माण झाली.

५. Ibid p. 617.

६. सुलभ विश्वकोश. –विकासवाद.

सखोल विचारानंतर पुष्कळशा अमेरिकन व युरोपियन मानववंशशास्त्रवेत्ते व समाजशास्त्रज्ञ यांना एकमार्गी विकासाची ( Unilineal evolution ) कल्पना ही समाजशास्त्रांत निरुपयोगी आहे असें वाटूं लागलें. त्यांना सामाजिक विकास याऐवजी सामाजिक परिवर्तन हा विकासक्रममुक्त शब्द जास्त पडूं लागला व तो शब्दप्रयोग जास्त शास्त्रीय स्वरुपाचा आहे असा युक्तिवाद करण्यांत आला. गेल्या कांहीं वर्षांत समाजशास्त्रज्ञांचें लक्ष पुनश्च या विषयांकडे वळलें असून त्यांत मॅकायव्हर या नामवंत समाजशास्त्रज्ञानें सामाजिक विकासाकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोन मांडला आहे.[७]

एकमार्गी विकासाच्या तत्वावर मांडण्यांत आलेल्या विविध विचारांचा परामर्श घेऊन ते असे म्हणतात कीं समाजशास्त्रांत या तत्वाचा अर्थ अप्रगत वा अविकसित समाजांतील सामाजिक संस्थांची परिणति प्रगत समाजांतील तत्सदृश संस्थांत होण्याचा विकासक्रम सर्वकालांत व सर्वदेशांत सारखाच राहील असा करावयाचा असल्यास तो त्यांना संमत नाही. त्यांच्या विचारसरणीचा मागोवा घेतल्यास असें आढळतें कीं विकासवादाचा गाभा मानण्यांत येणारें भिन्नत्वकारक परिणतीचें तत्व त्यांना समाजांतर्गत व्यवहारांत तीन स्वरूपांत दिसून पडतें.[८] एकतर समाजांतील श्रमविभागणी दिवसेंदिवस असें स्वरूप धारण करते कीं विवक्षित कार्य हें विशिष्ट व्यक्तिसमूहानेच करावयाचें अशी प्रथा पडू लागते व त्यामुळे व्यक्तींच्या कार्यशक्तींचें केंद्रीकरण होऊन त्या समूहांतील विविध घटकांचें परस्पर सहकार्य वाढत्या प्रमाणांत होऊ लागतें व त्यांतून कार्यान्वयी ( functional ) संबंधसमुच्चयाचें वर्धन होतें. द्वितीयपक्षी विविधप्रकारच्या कार्यान्वयी साहचर्यातून स्थापन झालेल्या संस्था अस्तित्वांत आल्याने व त्यांच्या संख्येंतील सतत वाढीमुळे प्रत्येक संस्थेचें कार्यक्षेत्र मर्यादित वा सीमित होतें व या कार्यसंकोचामुळे त्या संस्थेच्या कार्यक्षमतेत वाढ होते. तृतीयपक्षी सामाजिक विचार-विनिमयाच्या साधनांत–विशेषतः भाषेंत–जास्त सुधारणा व वैचित्र्य यांचा प्रादुर्भाव होऊ लागतो. इतर समाजशास्त्रज्ञांनी या तीन स्वरूपांपैकी एक वा दोन स्वरूपावर भर दिला असला तरी मॅकायव्हरसाहेबांना तीनहि स्वरूपें सारखींच महत्वाचीं वाटतात.

विकासवादाकडे दुर्लक्ष करण्याचें, समाजशास्त्रांत तरी, मुख्य कारण म्हणजे सामाजिक परिवर्तनाची तांत्रिक वा सांस्कृतिक परिवर्तनांशी घालून देण्यात आलेली विसंवादी सांगड हें होय. यामुळे सामाजिक परिवर्तनाचें बहुमुखी व जटिल स्वरूप इतकें व्यापक दिसूं लागलें कीं त्या विषयाचा अभ्यास करून त्यांतून विकासवादाशी सुसंगत असे बुद्धिगम्य सिद्धांत स्थापित करणें मानवी बुद्धीला कितपत शक्य होईल याबद्दल संदेह निर्माण झाला. याच्या जोडीला वर उल्लेखिल्याप्रमाणे स्पेन्सरादि लेखकांच्या लिखाणांतील अतिव्याप्ती व अतिसुलभता या दोषामुळे विकासवाद हा सामाजिक विज्ञानांत फलदायी होईल असा विश्वास वाटेनासा झाला. विकासवादाचें निश्चित स्वरूप आकलन न झाल्यानें समाजांतील निरनिराळ्या संस्थांचें आद्य स्वरूप व त्यांचें अद्यतन स्वरूप यांतलि विकासक्रमासंबंधांत विविध मतें मांडण्यात येऊं लागलीं व त्यांतील कोणत्या विवक्षित मतांकडे सत्याचें माप झुकतें आहे याचा बोध सर्वसामान्यांना होणें कठीण झालें. याकाळच्या विकासवादाचा पुरस्कार करणाऱ्या विद्वानमंडळींचा आवडता छंद म्हणजे समाजांतील प्रत्येक विद्यमान संस्थेचें वा कार्यान्वयी परस्परसंबंधाचें मूळ ( Origin ) शोधून काढणें हा होय. समाज केव्हां व कसा अस्तित्वांत आला असा प्रश्न विचारला असतां एखाद्या विद्वान माणसाची मतिसुद्धां कुंठित होणें साहजिक आहे. समाजाच्या निर्मितीचें बीज हें मानवाच्या जीवनांतच असावें असें दिसतें या पलीकडे या प्रश्नाचें जास्त निश्चित स्वरूपांत उत्तर देणें शक्य नाहीं. समाजाचा प्रचलनबिंदु ( point of origin ) शोधून काढणें शक्य होईल असें आजमितीला तरी वाटत नाहीं. हीच परिस्थिति समाजांतील कुटुंबसंस्था, धर्मसंस्था वा इतर कोणतीहि संस्था घेतली तरी तिच्याबाबतींत आहे. समाजजीवनाचा इतिहास चाळून पाहिला तर एक काळ निश्चितपणे असा असेल कीं जेव्हां समाजांत या संस्था अजिबात अस्तित्वांतच

७. McIver and Page, Society, chapter 27. P. 588.

८. Ibid P. 527.

नसतील. या कल्पनेने प्रभावित झालेल्या पुष्कळशा समाजशास्त्रज्ञांनी या संस्थांच्या आरंभासंबंधी नानाविध मतें प्रतिपादन केलीं. या मतांची सविस्तर छाननी केली असतां आज असें आढळतें कीं त्यांचें प्रतिपादन करणाऱ्यांच्या मनांत विकासवादाविषयीं बरेच गैरसमज वसत होते. समाजामध्ये शासनसंस्था नेहेमीच अस्तित्वात होती असें नाहीं, तरीपण शासनसंस्थेचा उगम वा आरंभस्थान शोधून काढणें अशक्यप्राय आहे. हें विधान विरोधाभासात्मक वाटलें तरी सत्य आहे ही गोष्ट आज विकासवादोत्तर काळांत सहज पटेल. आरंभस्थान शोधून काढण्याची हौस कितीहि असली तरी अगदी अलीकडे सुरू झालेल्या औद्योगिक क्रांतीचा प्रचलनबिंदु दाखविणें हें तरी कोणाला शक्य होईल? म्हणूनच सामाजिक विकासवादाची कास धरावयाची असेल तर आरंभस्थान शोधण्याची कल्पना सोडून देऊन एखाद्या चालीचें, आचाराचें वा संस्थेचें उद्भवन (Emergence) कसें झालें याकडे लक्ष द्यावें लागतें. म्हणून शासनसंस्थेचें मूळ शोधून काढण्याऐवजी तिचें उद्भवन कसें झालें असेल याचा शोध घेणें योग्य ठरेल. शासनसंस्था ही एक अशी कार्यान्वयी रचना आहे की जिच्यामध्यें समाजनियमनाची प्रक्रिया दिवसेंदिवस जास्त स्पष्ट, विस्तृत व कायम होत असते. त्यामुळें तिची रचना ही नातेसंबंधांच्या (Kinship) समुच्चयातून निर्माण होणाऱ्या कुटुंबसंस्थेपेक्षा निराळी होते. त्याचप्रमाणें एखाद्या चालीचें वा रूढीचें कायद्यांत रूपांतर होतें. याच न्यायानें पाहिलें असतां एकेकाळीं जरी समाजांत शासनसंस्था नव्हती तरी तिचा, कालपरिगणनेच्या दृष्टीनें पाहतां, प्रचलनबिंदु शोधून काढणें अशक्य आहे या विधानाचा अर्थ लक्षांत येतो. शासनसंस्था एका विशिष्ट क्षणीं वा विशिष्ट काळीं उत्पन्न झाली हें विधान तर्कशुद्ध सत्य असलें तरी त्या संस्थेचा विकासच इतिहासांत सापडतो, तिची जन्मतिथि सापडत नाहीं. विकासवादपूर्वकालीं उत्पत्ति या शब्दाचा अर्थ प्रत्यक्ष निर्मिति असा होत असला तरी आता संस्थेच्या उगमाची कल्पना फक्त वर दिलेल्या अर्थानेच खरी ठरते.[१]

---

१. Ibid p. 591.

---










प्रा. पंडित आवळीकर

# एक ‘ चंद्रहास्याख्यान ’

## प्रास्ताविक

माझ्याकडील एका लहानशा चोपडींत विष्णुदास नाम्याच्या ‘ कर्णपर्वा ’ बरोबरच एक ‘ चंद्रहास्याख्यान ’ उतरलेलें आढळलें. कागद बराच जुना असून चोपडीचा आकार ७½"×५" असा आहे. चोपडी कुणाची; कुणी व केव्हां हा भाग नकलला याबद्दल कांहींच उल्लेख नाहीं. तसेंच पहिलीं व शेवटचीं कांहीं पानें गहाळ झालेलीं आहेत.

या आख्यानावर “ आस्वमेध चंद्रहशाची कथा ” असा मजकूर असून प्रारंभीं : “श्री गणेशायेन्मः ।। श्री गुरुभ्योन्नमः ।। श्री कुळदेवायन्मः ।। ” असें नमन आहे. “ नीर्वीघ्नमस्तू ” असेंहि म्हटलें आहे. हा मजकूर कवीचा नसून प्रतकाराच्या पदरचा असावा असें वाटतें.

## कथेचा प्रारंभ

ते वळी वारु चंदनें चर्चिला । तोडर वामचरणि लेववीला । पूशी मूर्डिव घातलें । रत्नबध आवलीळा ।।१।।[1] या ओवीनें कथेचा प्रारंभ होतो. ‘ते वेळि’ या शब्दांतून त्या वेळेचें वर्णन कवीनें आधीं केलेलें आहे व तेंच वर्णन तो पुढें करणार आहे ही कल्पना सूचित होते.

म्हणजेच हा प्रारंभ एखाद्या नव्या किंवा स्वतंत्र आख्यानाचा प्रारंभ वाटत नाहीं. आधींचा भाग प्रतकारानें नकललेला दिसत नाहीं. त्यामुळें कथेला मध्येंच कोठेंतरी सुरुवात झाल्यासारखें वाटतें. पुढील कथाभाग वाचल्यावर पहिल्या कांहीं ओव्या गळलेल्या असाव्यात असा तर्क वाहतो.

## कथेची रूपरेषा

या ‘चंद्रहास्याख्याना’ची सुरुवात धर्मराजानें अश्वमेधाच्या वेळीं सोडलेल्या अश्वाच्या वर्णनानें होते. धर्माचा घोडा ‘ कोंतळापूर ’ नगराजवळ येतो आणि एकदम अदृश्य होतो. सगळीकडे ( हा ) ‘ हाकारू ’ उडतो. अर्जुनसुद्धां विस्मित होतो.

काय रीघाला गंगाजळि । कि प्रवेशला पाताळी ।<br>किंवा नेला गगनमंडळि । गंधर्वादिकि ।। १२ ।।

—असें सर्वजण म्हणूं लागतात.

इतक्यांत विमानांतून नारदमुनि येतात. कृष्णार्जुन त्यांना वंदन करून अश्वाचा वृत्तांत सांगतात. तेव्हां ‘ हासोनी ’ नारद सांगतात कीं चंदनावतीमध्यें तुमचा घोडा आहे. चंद्रहास्याच्या कथेचा प्रस्ताव नारदच करतात. चंद्रहास्याचा जन्म, वनवास, ‘ कळिंद्ररायें ’ त्याला पाळणें, दुष्टबुद्धीच्या कन्येशी लग्न, इ. घटनांचा उल्लेख या प्रस्तावांत येऊन जातो.

पार्थानें सर्व आख्यान ऐकण्याची इच्छा दर्शविल्यावरून नारद पुढील कथा सांगतात. पूर्वी ‘ कोळधापती थोर ’ राजा होऊन गेला. तो धार्मिक व प्रजाहितदक्ष होता. त्याला कालांतरानें एक पुत्र झाला. तो पुत्रहि मोठा सुलक्षणी होता.

परंतु अचानक राज्यावर परचक्र आलें. युद्धांत राजा मृत्यु पावला. राणीनें अग्निप्रवेश केला. त्यानंतर एका दाईनें तीन वर्षे चंद्रहास्याचा प्रतिपाळ केला. पुढें तीहि वारली. चंद्रहास्य निराधार झाला. गांवांतल्या ‘ लेकुरांमाजीं ’ तो खेळे— लोक त्याला घरीं बोलावत. खायला प्यायला देत.

खेळतां खेळतां त्याला एक दिवस ‘ शुध साळिग्राम सीला सांपडली. ’ शाळिग्रामाला आधीं स्नान घालून मग तो स्नान करी. त्याला आधीं नैवेद्य दाखवून मग तो भोजन करी.

कोणी त्याला ‘ टोपी अंगी ’ देत. तो सर्वांचा इतका आवडता होता कीं ‘ म्या अवतीलें चंद्रहास्या ’ असें म्हणून स्त्रियांत कलह चाले.

१. ओवींतील चौथा चरण तिसरा व तिसरा चरण चौथा हवा.



अनुक्रमणिका








एकदां दुष्टबुद्धिप्रधानाच्या घरीं ' माहाउछावो ' चालला होता. दुष्टबुद्धीनें चंद्रहास्याला ' साउमा ' बोलावलें. ' तुहि जेवी गा वहिला ' असें म्हटलें. चंद्रहास्यानें देवतार्चन केलें. शाळिग्रामाला नैवेद्य दाखविला. ' तीर्थ घे तुळसी समवेत ' आणि ' रुषीमधीं ' जेवावयास बसला.

ऋषींना या मुलाचें कौतुक वाटलें:—

आवघे आसीर्वाद देत ।
राज्ये करी या पूत्रासमवेत ।
क्षोभले प्रधानाचे चीत ।
काये बोलत कवणाश ॥ ४५ ॥
वाउगाची असिर्वाद देता ।
पूत्र कोन्हाचा नेणता ।
घालेती भरलेंती अता ।
घरा जारें आपुलीयां ॥ ४६ ॥

' मानूभावाचे' आशीर्वाद खोटें होणार नाहींत तर या गोष्टाचा प्रतिकार कसा करावा या विचारांत दुष्टबुद्धि गढून गेला. त्यानें चांडाळांना बोलावून ' हें बाळ वधा वनीं ' म्हणून सांगितलें. ' वामचरणीची सावी अंगोळी । खुण अणा मजजवळी ' असेंहि बजावलें.

चांडाळांनीं चंद्रहास्याला भुलवून वनांत नेलें. 'खर्ग' काढलें व देवाचें नांव घेण्यास सांगितलें. चंद्रहास्यानें मुखांतून ' सीळा ' काढली. तिच्या वियोगाची कल्पनाच त्याला सहन होईना. प्राणाहून या वियोगाचें दुःख त्याला अधिक झालें. तो ' फूदफूदुनी रूदन ' करूं लागला. चांडाळांना दया उपजली. त्यांनी त्याची सहावी ' अंगोळी ' कांपली. प्रधानाला दाखविली. संतुष्ट होऊन दुष्टबुद्धीनें त्यांना द्रव्य दिलें.

चंद्रहास्य वनांत हिंडूं लागला. इतक्यांत शिकारीला आलेल्या ' कळिंद्र ' राजानें त्याला पाहिलें. त्याचें नांव विचारलें. त्याला प्रेमानें हृदयाशीं धरलें व त्याला घरीं घेऊन आला. चंद्रहास्याच्या स्वागतार्थ प्रजाजनांनीं ' गुढ्या मखरें उभविल्या ' कळींद्राचें ' राज्य अधिक बळावलें'.

चंद्रहास्याला सहावें वर्ष लागल्यावर त्याला शिकविण्यासाठीं ' पंत ' नेमला गेला. परंतु ' हरी ' खेरीज हा शिष्य दुसरें कांहीं लिहीना. सातव्या वर्षी मुंज होऊन वेदाभ्यासाला सुरुवात झाली. आठव्या वर्षी तो ' वेद पढीनला '.

सोळाव्या वर्षी चंद्रहास्यानें राजाकडे दिग्विजयाला जाण्यास आज्ञा मागितली. राजा म्हणाला कीं एवढ सामर्थ्य आपणांत नाहीं. कौंतळेश्वर व दुष्टबुद्धि ही गोष्ट ऐकून रागावतील; तरीहि चंद्रहास्य गेला व त्यानें ' जींकीलें पृथ्वीचे भुपती '.

यापुढील कथाभाग गहाळ झाला आहे. उपलब्ध भागांत २०३ ओव्या आहेत. दुष्टबुद्धीनें चंद्रहास्याच्या नाशाचे केलेले प्रयत्न व त्यांतून पार पडून चंद्रहास्याचें त्याच्या कन्येशीं ( व कौंतळेश्वराच्या कन्येशीं ) झालेलें लग्न आणि राज्यप्राप्ति या घटना या आख्यानांत पुढें आल्या असतील पण त्या उपलब्ध नाहींत.

## कथेंतील सौंदर्यस्थळें

या आख्यानाच्या कवीची प्रतिभा वर्णनांत चांगली रमते. धर्माच्या अश्वाचें वर्णन त्या दृष्टीनें पाहण्यासारखें आहे:—

घोश मूक्ताफळाचे दोहि घडी ।
शुध साडें पंधराची शखळाकडी ।
आदभुत विराचीया प्रौढि ।
वारू पूढां सोडीला ॥ २ ॥
सुवर्ण कडीयाळि खलीळां ।
पूष्पाचीया माळा गळा ।
घातलीया प्रबळा ।
शोभती अंगकांती ॥ ३ ॥
शुभ्र दिसती चंद्रप्रभा ।
कस्तुरी कुंकुम महतीची शोभा ।
ठाईंटाई चमकत बीबत उभा ।
भाळी सुवर्णपत्रे बांधली ॥ ४ ॥

जेव्हां चंद्रहास्याला चांडाळ मारणार असतात तेव्हां त्याच्या ध्यानांतील मूर्तीचें कवीनें केलेलें वर्णन केवळ अप्रतिम आहे:—

चरणि वा नेपुरे गर्जति ।
तेणे कलिकाळ कांपती ।
जग तारावया श्रीपति ।
दुजा क्षीति आसेना ॥ ६९ ॥







ध्वज अंकुश उर्ध्वरेखा ।
कोटि दीप्ती नखी देखा ।
तेणे ससी अर्का ।
उणेपण आणीले ॥ ७० ॥

जेवि सुंदर रातोत्पळ ।
घोटी सकुमार सुनिळे ।
कैसी शोभति वर्तुळे ।
मुक्ताफळे लाजीली ॥ ७१ ॥

पोटरीया जानुजंघ ।
जेवी ईंद्रनिळस्तंभ ।
की स्वर्गिंहुनि मेघकोंब्र ।
सरळ स्वयेभ उगवले ॥ ७२ ॥

माज अतिशय सुंदर ।
वर कासीला पीतांबर ।
वाजती घटीका मनोहर ।
तेणे अंबर गर्जतसे ॥ ७३ ॥

नाभिवर्तुळ समान ।
जथे विधिचें जन्मस्थान ।
मदन त्यागुन आभीमान ।
उदरासि आला तो ॥ ७४ ॥

ह्रदयाचे उतमपण ।
कोण वर्णील महिमान ।
श्लाध्यता कळेल विप्रजन ।
श्रीवत्सलांछन शोभतसे ॥ ७५ ॥

बाहुदंड सरळे ।
विरकंकणे विराजले ।
गुढगे परीयंत आले ।
यालागी आजानबाहो ह्मणती ॥ ७६ ॥

अंगोळिया सरळ देखा ।
जडीत शोभति मुद्रिका ।
कोटि कंदर्प नखी यका ।
हरपोनया गेले ॥ ७७ ॥

करी कौस्तुभ सुमनमाळा ।
आपादवरी मिरवे गळा ।
तैसीच वैजंतिमाळा ।
हरीसुख घेतसे ॥ ७८ ॥

श्रवणि कुंडले मकराकारे ।
दिप्ति फिटे आज्ञान धारे ।
उपमे लाजे दीनकरे ।
नभमंडळि राहीला ॥ ७९ ॥

दंतप्रभा आति साजीरी ।
जेवि रत्ने बैसलि हारी ।
ताम्र वोष्ठचि सरी ।
प्रवाळे ते न पावलि ॥ ८० ॥

नासीकट सरळ ।
नेत्र शोभति विशाळ ।
पाति राहिलि निश्चळ ।
कृपादृष्टी पाहातुसे ॥ ८१ ॥

भक्ती विघ्न वरपडा होती ।
ह्मणोनि न लगती पातिया पाति ।
कृष्ण माउलि कृपामुर्ति ।
सहजस्थिति पाहातुसे ॥ ८२ ॥

भोवया आती व्यंकटा ।
भेटो आलिया भृकुटा ।
देखतांचि धाका मोटा ।
सुराआसुर कांपति ॥ ८३ ॥

टिळा रे ( ख ) खीला कस्तुरीचा ।
सीरी मुगुट रत्नखचतिचा ।
बाप पुतळा मन्मथाचा ।
ऐसा साच देखीला ॥ ८४ ॥

चंद्रहास्याच्या नगरीचेंहि असेंच सुंदर वर्णन कवीनें केलेलें आहे. या वर्णनांचा विशेष हा कीं, त्यांत कल्पना विलास असून तो रसोत्कटतेला पूरक आहे. उपमा व उत्प्रेक्षा हे कवीचे आवडते अलंकार. चंद्रहास्य खेळताना मुलांत कसा दिसे त्याचें वर्णन करणारी ओवी पहाः-

सवें बाळकांचि मांदि ।
खेळतसे जे बिदि ।
जैसा चंद्र तारामधी ।
तैसा मीरवें चंद्रहास्य ॥ ३६ ॥

कळींद्रराजाच्या शिकारीचें वर्णन करतांना अशीच एक ओवी येते —

तव वेगाथीले असी वारें ।
हिसे गर्जतसें अंबर ।
गजावरी घालुनी पाखर ।
जेवी गीरीवर चालीलें ॥ ११९ ॥








रसोत्कटतेच्या दृष्टीनें चंद्रहास्यानें केलेला धांवा पाहाण्यासारखा आहे.

## कथन-चातुरी

कवीची कथन-चातुरी खरोखर वेधक आहे. ही कथा प्रतिलोम ( Flash-back ) पद्धतीनें सांगितली गेली आहे. धर्माच्या अश्ववर्णनानें प्रारंभ करून नारदाच्या मुखांतून, चंद्रहास्याची कथा वदविण्यांत कवीचें निवेदनकौशल्य दिसतें.

चंद्रहास्याच्या जीवनांतील नंतरचा एक प्रसंग घेऊन त्याच्या जीवनांतील आधींच्या घटना कवीनें वर्णिल्या आहेत. आख्यानकाव्याला लागणारी ओघवती भाषा कवीजवळ आहे. थोड्या शब्दांच्या साह्यानें एखादें चित्र डोळयांपुढें उभें करण्याचें सामर्थ्य त्याच्या वर्णनांतून दृष्टीस पडतें. त्याच्या निवेदनाची ही दृश्यात्मक पद्धति सांगितलेली सर्व कथा डोळयांपुढें उभी करूं शकते.

या आख्यानाची भाषा बरीच जुनी आहे. पूछी ( पुच्छीं ); साडेपंधरा ( सोनें ); साउमा ( समोर ); उच्छवो ( उत्सव ); बोहरी ( नाश ); लेहि ( लिही ), अंवतीलें ( आमंत्रण दिलें ); जाजावली ( त्रासली ); टोपी अंगी ( अंगडें टोपडें ); घालेंति भरलेंती ( खाल्लांत प्यालांत ); खर्ग ( खड्ग ); फरशराम ( परशुराम ); हारी ( ओळीनें ); व्यंकटा ( वांकड्या ); बिदि ( रस्त्यांत ); पढीनला ( पढला ); शुध ( शुद्ध ); यांसारखे शब्दप्रयोग त्या दृष्टीनें टिपण्यासारखे आहेत. भाषेचा विचार करतां ती एकनाथोत्तर वाटत नाहीं. भाषेवरून हा कवि एकनाथपूर्व असावा असें वाटतें.

## आख्यानाचा कवि

या चंद्रहास्याख्यानाचा कवि कोण याचा नीट उलगडा होत नाहीं. सर्व आख्यान मिळालें असतें तर शेवटीं कोठेंतरी कवीचा उल्लेख आला असता. हें आख्यान म्हणजे स्वतंत्र कृति आहे कीं, कवींनें लिहिलेल्या संपूर्ण अश्वमेधांतील एक भाग आहे याचाहि खुलासा होत नाहीं.

तव पार्थ ह्मणें जी ताता।
पूर्वि परब्रह्म उपदेशीतां।
राउळीं सांगीतली होती कथा।
या चंद्रहास्याची ॥ २५ ॥

ही ओवी चिंत्य आहे. नारदांना कथा सांगा असें म्हणतांना अर्जुन सांगतो कीं पूर्वी परब्रह्माचा उपदेश करतांना ( कोणाला ? ) नारदांनीं ही कथा सांगितली होती : पण त्यावेळी मी तेथें नव्हतों. या ओवीवरून हें आख्यान स्वतंत्र ( म्हणजे सुटें ) नसावें; अशी शंका निर्माण होणें शक्य आहे. परंतु अशा तऱ्हेचा उल्लेख श्रीधराच्या ' जैमिनी अश्वमेधांत ' येत नाहीं. त्यावरून ही कथा पूर्वी नारदानें सांगितली होती ही कवि-कल्पना ( poetic device ) दिसते. तिच्यामुळें कथेंचें महत्व वाढतें.

अश्वमेधावर रचना करणाऱ्या नऊ कवींची माहिती ' महाराष्ट्रसारस्वतां'त भाव्यांनीं दिलेली आहे. श्रीधराच्या अश्वमेधाखरीज अन्य रचना प्रसिद्ध झालेली नाहीं. प्रस्तुत आख्यान हें थोड्याफार फरकानें श्रीधराच्या ' जैमिनी अश्वमेधां 'तील अध्याय ५१, ५२, ५३ व ५४ च्याचा प्रारंभ या भागांत आलें आहे. एवढेंच नव्हें तर श्रीधराच्या उपर्युक्त कथाभागावर या आख्यानाची दाट छाया आहे. त्यावरून श्रीधरानें तें पाहिलें असावें याची खात्री होते.

श्रीधरावर ज्या प्राकृत कवींची दाट छाया आहे त्यांत विष्णुदास नामा व मुक्तेश्वर हे प्रमुख होत. त्यांतहि विष्णुदासनाम्याचा प्रभाव त्याच्यावर अधिक दिसतो. मुक्तेश्वर हाहि विष्णुदासनाम्यापासून बरेंच घेतांना दिसतो. विष्णुदासनामा, मुक्तेश्वर व श्रीधर यांच्या हरिश्चंद्राख्यानाचा तौलनिक अभ्यास ( हा मी अन्यत्र मांडत आहे ) हेंच स्पष्ट करतो.

मुक्तेश्वरानें अश्वमेधावर रचना केलेली नाहीं. ( केलेली असल्यास उपलब्ध नाहीं ). प्रस्तुत ' चंद्रहास्याख्यान ' व श्रीधराचें आख्यान यांच्या तौलनिक अभ्यासांत दुसरें पहिल्याच्या अनुकरणासारखें वाटतें. या दोन कृतींतील कांहीं साम्यस्थळें पुढें देत आहे.

## हस्तलिखितांतील ओव्या

सांप्रत वैष्णव धर्म अचरणे।
केवळ परब्रह्माकारणें ॥
कोतळेस्वर राजमाने।
नेणोनि वनांतरी केला ॥ १६ ॥
दुष्टबूधि प्रधा ( न ) नंदनी।
प्रणीली चंद्रहास्यालागुनी ॥







कोतळाधिपती वौशी उपजोनी।
कळिंद्रायें पाळीला ॥ १७ ॥
पाहो ठाकती दोहि भार्गी।
कोण्ही लेववी टोपीअंगी ॥
बारे मुकेल्या जालासी वेगी।
जेवी आरता ये चंद्रहाशा ॥ ३७ ॥

**श्रीधराच्या ओव्या**

जो वैष्णवांमाजी मुगुटमणी।
नित्य ध्यातसे चक्रपाणी ॥
कुंळेशें तया राज्य देउनी।
आपण गेली तपातें ॥ ५१—२७ ॥
दुष्टबुद्धि प्रधान नंदिनी ॥
जेणें वरिली कौतुकें करोनी ॥
कुलिंदें पाळिलें त्या लागोनि।
केरळाधिपाचा पुत्र जो ॥ ५१—२८ ॥
बाळांसवे करी क्रीडन।
अनाथ जाणोनि देती भोजन ॥
कोणी आंगडटोपी जाण।
देती आपले बाळांचीं ॥ ५१—५२ ॥

कथेच्या दृष्टीनें पाहतां श्रीधर तीच कथा सांगतो. नांवें मात्र भिन्न दिल्यासारखीं वाटतात. चंद्रहास्याच्या वडिलांचें वर्णन करतांना,

पूर्वी कोळघापती थोर।
स्वधमी कुळविख्यात ॥ ३६ ॥

असें त्याचें नांव हस्तलिखितांत आढळतें. पुन्हां २८व्या ओवींत 'कोळघापती' असेंच नांव येतें. तर आधीं १७व्या ओवींत 'कोतळाधिपती' असें येतें. श्रीधर 'केरळाधिपती' असें म्हणतो व 'सुधार्मिक' हें नांव देतो. 'स्वधमी' हें 'स्वधर्मी' म्हणजे 'सुधार्मिक' नेंच भ्रष्ट रूप दिसतें.

हस्तलिखितांत 'कळिंद्रायें'; 'कळींद्रदेसीचा भूपती' असें नांव वापरलें आहे. श्रीधर 'कुलिंद' नांवाचा उपयोग करतो. कोतळेस्वर व कुंतलेश्वर अशीं नांवें अनुक्रमें, आपला कवि व श्रीधर हे वापरतात. श्रीधरानें सर्वत्र चंद्रहास असेंच नांव दिलें आहे. तर हस्तलिखित आख्यानांत तें चंद्रहास्य असें आढळतें. (म्हणूनच या आख्यानास 'चंद्रहास्याख्यान' म्हटलें आहे). चंद्रहस्य, चंद्रहस्य अशीं रूपें आढळलीं तरी तीं लेखनप्रमादाचीं किंवा भाषेच्या जुनाटपणाचीं द्योतक वाटतात. धृष्टबुद्धि' हा दोन्ही ठिकाणीं 'दुष्टबुद्धि' झाला आहे.

**'चंद्रहास्याख्यान' आणि मुक्तेश्वर**

चंद्रहास्य कृष्णाचा धांवा करतो, त्यांत येणारा दशावतारांचा उल्लेख महत्वाचा आहे. त्या ओव्या अशा :—

मदूसुदना चक्रधरा।
केशवा अनंत अवतारा।
मछवेश धरूनी सागरा।
धांडोळीले तुवा ॥ ५६ ॥
कमळनयना कमळांपति।
कासवे रूपे श्रीपती।
रसातळां जाता क्षीती।
धरीली दाती उचलुनीया ॥ ५७ ॥
सर्वोत्तमाजी वामना।
सानेपणें न मासी त्रीभूवना।
औठ हात भूमी घेता दाना।
तुजवीण नेणवेची ॥ ५८ ॥
नरहरी पावे फरशरामा।
रामचंद्रा वीरोत्तमा।
कृष्णा तु घनशामा।
मोहनकामा धरीसी तुं ॥ ५९ ॥
कलंकि अवतार धरी।
महि गाजीता असुरी।
तुजवीण नरकेशरी।
कोण साह्ये करील ॥ ६० ॥

मुक्तेश्वराच्या सभापर्वांत द्रौपदीवर वस्त्रहरणाचा प्रसंग ओढवतो. तेव्हां तिनें केलेला धांवा अगदीं असाच आहे. दशावतारांना आवाहान करण्याची गल्पना मुक्तेश्वराला 'चंद्रहास्याख्यानां'वरून सुचली असावी असा विचार मनांत येतो; निदान तशी शंका येते.

**'चंद्रहास्याख्यान' व विष्णुदास नामा**

विष्णुदासनाम्याच्या माझ्याकडील 'हरिश्चंद्रोपाख्यान' या त्रुटित हस्तलिखिताशीं 'चंद्रहास्याख्याना'ची तुलना करतांनां कांहीं वर्णनें सारखीं वाटलीं.











हरिश्चंद्र व 'कळिंद्र' हे वनांत शिकारीला येतात तेव्हांचींहि वर्णनें पाहण्यासारखीं आहेतः—

**' चंद्रहास्याख्यान '**

तव वेगाथीले असीवारें ।
हिंसे गर्जतसें अंबर ॥
गजावरी घालुनीया पाखर ।
जेवी गीरीवर चालीलें ॥ ११९ ॥
हुंकारीती शब्दे तिखटें ।
सहश्र लक्षवनिं सुभट ॥
घडघडीलें चक्रवाट ।
हाकित टाकित पायाचें ॥ १२० ॥
पाडीती हरणाच्या मुरकुंडी ।
जीह्वा काढिती धावती परवडी ॥
विरदोर्दंड प्रचंडीं ।
वन झाडीलें पारधीयें ॥ १२२ ॥
ससी सावज अडकती ।
येक अनेक पडती ॥
येक शब्दे गर्जती ।
हुकांर करूनीया ॥ १२३ ॥

**' हरिश्चंद्रोपाख्यान '**

किंकाट सुटले कुंजर ।
रथ घडघडिले अपार ॥
हिसताति रहिंवर ।
तेणें अंबर दणाणिलें ॥ २–४३ ॥
नक्षत्रें लोपलिं गगनिं ।
भारें दाटलि मेदनि ॥
ऐसें अपार चालिले सैन्यवनि ।
रजें दिनकर लोपला ॥ २–४४ ॥
सिंहीनादें गर्जति विर ।
येक रोहिं चितळें मारिती अपार ॥
येक गेंडे मारिति थोर ।
ऐसि वद्याळि खेळति ॥ २–५१ ॥
येक लंगडें ससाणा सोडिति ।
येक उडतां पांखरूं मारिति ॥
येक जळिं खळती ।
पारधि राया ॥ २-५२ ॥

वरील ओव्यांतील शब्द व कल्पना यांच्यांतील साम्य चिंत्य आहे. विष्णुदासनाम्याच्या ध्वन्यनुकरण-प्रीतीचा ध्वनि 'चंद्रहास्याख्यानां'त ऐकूं येतो. दोन्ही आख्यानें भाषेच्या दृष्टीनें जवळचीं– एकाच कवीनें लिहिल्यासारखीं– वाटतात.

विष्णुदास नामा हा या आख्यानाचा कर्ता असावा असा माझा तर्क– निष्कर्ष नव्हे– आहे. नऊ अश्वमेधांची माहिती देतांना "सातवा नामा विष्णुदासाचा" असं[२] भाव्यांनीं म्हटलें आहे. "नामा पाठकानें सांगितलेली चंद्रहासाची कथा एकंदर ग्रंथाच्या मानानें पुष्कळ सरस उतरली आहे;" असेंहि मत ते देतात. हें आख्यान नामापाठकाचें नसेलच असें म्हणवत नाहीं. तरीहि वर जे बाह्य व अंतर्गत आधार दिले आहेत त्यावरून त्याचा कर्ता विष्णुदास नामाच ठरेल असें वाटतें. विष्णुदास नाम्याच्या अश्वमेध ग्रंथाचा उल्लेख भाव्यांनीं केला खरा. परंतु आज तो कोठें उपलब्ध आहे याची कल्पना नाहीं. प्रसिद्ध झालेल्या हस्तलिखितांच्या सूचीत या अश्वमेधाचें नांव आढळत नाहीं. त्यामुळें अशा दुर्मिळ ग्रंथांतील भाग ह्मणून या 'चंद्रहास्याख्याना'चें मला महत्व वाटतें. ज्या चोपडींत हें आख्यान लिहिलें आहे तिच्यांत केवळ विष्णुदास नाम्याचीच रचना आहे; ही गोष्टहि या आख्यानाचें कर्तृत्व त्याला देतांना विचारांत घेण्यासारखी आहे.[३]

---

२. महाराष्ट्र सारस्वत, पृ. २४५

३. चंद्रहास व धृष्टबुध्दि हीं मूळ नांवें न वापरतां आख्यानांतील चंद्रहास्य व दुष्टबुद्धि हींच नांवें लेखांत वापरलीं आहेत.







अनुक्रमणिका

श्री. म. दा. साठे

# प्रयाग व त्यासंबंधीं कांहीं धार्मिक समजुती*

### प्रास्ताविक

वेदान्त ग्रंथांत उपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि गीता यांना ' प्रस्थानत्रयी ' म्हणतात त्याप्रमाणें तीर्थयात्रेंत ' त्रिस्थली ' प्रसिद्ध आहे. काशी, प्रयाग आणि गया या तीन क्षेत्रांना मिळून त्रिस्थली म्हणतात. बद्री-केदार, जगन्नाथपुरी, रामेश्वर व द्वारका या भारताच्या चार दिशांना असलेल्या चार क्षेत्रांना ' चार धाम ' म्हणण्याची पद्धत आहे.

त्रिस्थलीपैकीं आज प्रयागाबद्दलचा इतिहास व दंतकथा देण्याचा विचार आहे.

प्रयाग क्षेत्राचा उल्लेख ऋग्वेदांत आहे.[1] त्या ऋचेंत म्हटलें आहे कीं, जें गंगा आणि यमुना यांच्या संगमावर स्नान करितात ते स्वर्गाप्रत जातात आणि जे तेथें नैसर्गिक मृत्यु पावतात अथवा जल समाधि घेतात ते मोक्षाप्रत जातात! प्रयागतीर्थाला ' तीर्थराज ' म्हणतात. महाभारतांत वनपर्वांत व अनुशासनपर्वांत प्रयागक्षेत्राचा महिमा वर्णन केला आहे. इतर पुराणेंहि– मत्स्य, कूर्म, ब्रह्मांड, वायु, पद्म– मागे नाहींत. रामायणांत मात्र प्रयागतीर्थाचा नाममात्र उल्लेख आहे. त्या उल्लेखावरून असें समजतें कीं त्यावेळीं तेथें घनदाट अरण्य होतें, गंगा आणि यमुना या दोहोंमध्यें गुप्तरूपानें वाहणारी सरस्वती नदी आहे तिचा संगमहि याच ठिकाणीं होतो. श्रद्धा अशी आहे कीं केवल या संगमाच्या दर्शनानें, किंवा नामोच्चारानें अथवा तेथील मत्तिका अंगाला लावल्यानें मनुष्य पापापासून मुक्त होतो! येथें जे मृत्यु पावतात त्यांना पुनर्जन्म नाहीं.[3] पितामह ब्रह्मदेवानें येथें याग केला म्हणून याला 'प्रयाग' म्हणतात. व तीन नद्यांचा संगम असल्यानें ' त्रिवेणी ' असेंहि म्हणतात.

प्रयागक्षेत्राचा विस्तार पुराणांतून पांच योजने सांगितला आहे. प्रलयकालीं प्रयागक्षेत्र सुरक्षित राहतें व त्यावेळीं ब्रह्मा, विष्णु आणि महेश तेथें वास्तव्य करतात. प्रयागक्षेत्रीं पितरांचें पितृश्राद्ध करून कपिला गाईचें दान करतात. कांहीं क्षेत्रीं दान केलें असतां विशेष पुण्य मिळतें, इतर स्थलांपेक्षां क्षेत्रीं दान केल्याचें पुण्य अधिक असतें. ' कुरुक्षेत्रे प्रयागे च गंगासागरसंगमे । यद्दानं दीयते शक्त्या तदानंत्याय कल्पते । ( ब्रह्मांड पुराण )

### प्रयागक्षेत्रीं क्षौराचें महत्त्व

प्रयाग क्षेत्रीं वपन करावें, गयेला पिंडदान करावें, कुरुक्षेत्रीं दान करावें व वाराणसीला देहत्याग करावा असें शास्त्रवचन आहे. त्यांत प्रयागक्षेत्रीं क्षौर न केल्यास इतर सर्व व्यर्थ होय असेंहि म्हटलें आहे. विधवांनीं तर वपनच करावें पण सधवानीं सुद्धां दोन तीन अंगुळें केशकर्तन करावें. यालाच ' वेणीदान ' म्हणतात. उपनयन न झालेल्या पण चूडासंस्कार झालेल्या मुलांनींहि क्षौर करावें. सर्व पाप केसांच्या मुळाशीं सांठलेलें असतें असा समज आहे ! दक्षिण देशांत प्रौढ सुवासिनी क्षेत्रीं वपन

---

* हा लेख मुख्यतः म. म. डॉ. पां. वा. काणे यांच्या ' History of धर्मशास्त्र ' खंड ४ यावर आधारलेला आहे.

१. सितासिते सरिते यत्र संगते तत्राप्लुतासो दिवमुत्पतन्ति ।
ये वै तन्वं विसृजन्ति धीरास्ते जनासो अमृतत्वं भजन्ते ॥ – ऋ. १०. ७५

२. माघमासे प्रयागे तु नियतः संशितव्रतः ।
स्नात्वा तु भरतश्रेष्ठ निर्मलः स्वर्गमाप्नुयात् ॥ – अनुशासन २५. ३६

३. एतत् प्रजापतेः क्षेत्रं त्रिषु लोकेषु विश्रुतम् ।
अत्र स्नात्वा दिवं यान्ति मृतास्तेऽपुनर्भवाः ॥ – कूर्म १. ३६. २०



अनुक्रमणिका

करतात हें ऐकून धक्काच बसतो! पण त्या स्त्रिया पापनाशासाठीं खुषीनें वपनाला तयार होतात व सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या पतीची त्या वपनविधीला संमति असते. तिरुपति क्षेत्रीं ही चाल आहे!

**प्रयागक्षेत्रीं देहार्पण**

सामान्यतः शास्त्रवचनाप्रमाणें आत्महत्या हें पाप आहे. कांहीं स्मृतिकार तर म्हणतात कीं महापातकाचें प्रायश्चित्त म्हणून सुद्धां देहान्त प्रायश्चित्त दोषार्ह आहे. उलट महाभारत, पुराणें व कांहीं स्मृति यांतून कांहीं अपवाद सांगितले आहेत. महापातकांना देहान्तप्रायश्चित्त सांगितलें आहे. ब्राह्मणाची हत्या हें पंचमहापातकांपैकीं एक पातक असल्यानें नारायणरावाचा खून राघोबानें केल्याचें सिद्ध झाल्यावर रामशास्त्री प्रभुण्यांनीं त्याला देहान्त प्रायश्चित्त सांगितलें! दुसरी गोष्ट अशी कीं वानप्रस्थाश्रमी मनुष्याचे महाप्रस्थानसमयीं किंवा दुर्धर रोगानें पीडिलेला, नित्य कर्में करण्यास असमर्थ असलेला अशा माणसानें कड्यावरून किंवा वटवृक्षाच्या उंच फांदीवरून उडी घ्यावी किंवा जलसमाधि घ्यावी, अग्निकाष्ठें भक्षण करावींत किंवा प्रायोपवेशन करून देहत्याग करावा. हें झालें वानप्रस्थानश्रमी मनुष्याचें. गृहस्थाश्रमी मनुष्याला जर वाटलें कीं आपलें जीवितकार्य संपलें आणि ऐहिक जगांतील सुखाचा उबग आला तर त्यानें हिमालयावर जाऊन खुशाल देहत्याग करावा. याला धार्मिक देहत्याग ( Religious suicide ) म्हणतात व यापासून पाप लागत नाहीं असा समज आहे! आजहि कांहीं लोक हृषीकेश येथील गंगेवर अधांतरीं लोंबकाळणाऱ्या लक्ष्मण झोल्यावरून खालीं खळखळणाऱ्या गंगेच्या प्रवाहांत देहार्पण करतात! धर्ममूलक देहत्याग गंगेंत किंवा प्रयाग येथील संगमांत अथवा अक्षयवटाच्या बुंध्याशीं करण्यांत पाप नाहीं असें समजण्यांत येतें. सहगमनानें सतीला आत्महत्येचा दोष लागत नाहीं तो याच कल्पनेमुळें. ब्रह्मज्ञान झाल्यानेंच मोक्ष मिळतो असें जरी आहे तरी वरीलप्रमाणें ब्रह्मज्ञान झाल्याशिवायहि मोक्ष मिळतो असा केवळ सामान्य मनुष्याचाच विश्वास आहे असें नाहीं तर कालिदासासारख्या कवीचीहि तशी समजूत होती!

ऐतिहासिक कालांत यशःकर्णदेव, चंदेलधंगदेव, सोमेश्वर, चालुक्य यांनीं प्रयागक्षेत्रीं किंवा तुंगभद्रेंत देहत्याग केल्याचें इतिहास सांगतो. मगधदेशाच्या कुमारगुप्तानें अग्निप्रवेश केला!

**ऐनीअकबरींत**

आत्महत्येचे पांच प्रकार दिले असून त्यांत दोष मानला जात नाहीं असें म्हटलें आहे. प्राणांतिक प्रायोपवेशन, रानशेण्यांनीं स्वतःला आच्छादून त्यांत जळून भस्मसात् होणें, बर्फांत गाडून घेणें, स्वतःच्या पापांचा उच्चार करून गंगासागरसंगमांत उडी घेऊन जीव देणें व प्रयागास गंगायमुनांच्या संगमावर देहार्पण करणें हे ते पांच प्रकार होत.

राजतरंगिणींत राजानें प्रायोपवेशनानें कोणी आत्महत्या करण्यास तयार झाला तर त्याच्यावर नजर ठेवण्यास राजपुरुष नेमावे असें म्हटलें आहे.

आत्महत्या करणारे लोक अंधकाराने व्यापलेल्या नरकाप्रत जातात असें वाजसनेयी संहितेत म्हटलें आहे.[४] शतपथ ब्राह्मणांतहि याच अर्थाचें वचन आहे. मनुस्मृतींतहि ( ५.८८ ) आत्महत्या निषिद्ध मानली आहे इतकेंच नव्हें तर अशांच्या नांवानें सुतक पाळूं नये, त्यांना तिलोदक देऊं नये किंवा त्यांच्या नांवानें पिंडदानहि करूं नये असें स्पष्ट म्हटलें आहे. पण वनपर्वांत व इतर स्मृतींत या विरुद्ध वचनें आढळतात.

**मानसशास्त्रदृष्ट्या यामागील पार्श्वभूमि—**

प्रयाग किंवा अन्य तीर्थाचे ठिकाणीं धार्मिक

४. असूर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः
तांस्ते प्रेत्याभिगच्छंति ये के चात्महनो जनाः ॥ — वा. सं. ४०. ३








देहार्पण (Religious suicide) करण्यामागील मानसशास्त्रदृष्ट्या असलेली पार्श्वभूमि समजणें कठीण नाहीं. शतकानुशतकें एका विशिष्ट तत्त्वज्ञानप्रणालीनें हिंदुमनावर खोल परिणाम केला आहे तो असा कीं आत्म्याला अनंतकालापर्यंत जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत हिंडावें लागतें. पण प्राचीन धर्मशास्त्रानें या फेऱ्यांतून सुटका करून घेण्यासाठीं दोन मार्ग सांगून ठेविले आहेत. पहिला ब्रह्मज्ञान मिळवून 'ज्ञानी' होणें व दुसरा तीर्थाचे ठिकाणीं[५] देहत्याग. संसारांत अनेक विपत्तींना न कुरकुरतां सर्व प्रकारचीं दुःखें व गैरसोयी सोसणाऱ्या मनुष्याला मृत्यूचें भय वाटत नसे! संसाराला कायमचा रामराम ठोकण्याचा एकाग्रानें दृढनिश्चय केला तर त्याला प्रयागक्षेत्रीं मरण आल्यानें मोक्ष मिळणार या कल्पनेपेक्षां अधिक उदात्त कल्पना कोणची सुचणार ?[६] या तत्त्वज्ञानाला अनुसरून महाभारत, कूर्म, स्कंद, ब्रह्मांड इत्यादि पुराणांतून प्रयाग येथें धार्मिक देहार्पण केल्यानें मोक्ष मिळतो असें स्पष्ट स्पष्ट म्हटलें आहे.

### हुएनसंगाची साक्ष

चिनी प्रवासी हुएनसंग (सन ६२९ ते ६४५) आपल्या प्रवासाच्या वृत्तांतांत भारतांतील धार्मिक देहार्पणाचा उल्लेख करतो. कल्पतरुग्रंथांत (त्याचा काल सन (१११० ते ११२०) 'महापथयात्रे'वर एक प्रकरण खर्ची पडलें आहे. ही धार्मिक आत्महत्येची कल्पना प्रथमतः काशी-प्रयागापुरतीच होती ती हळूहळू इतर क्षेत्रांत पसरूं लागली !

पण कालाच्या ओघांत प्रत्येक कल्पनेला चढ-उतार असतोच. त्याप्रमाणें पुढें पुढें हा आत्महत्येचा प्रकार निषिद्ध मानला जाऊन कलिवर्ज्य प्रकरणांत त्याचा अंतर्भाव झाला. महाभारताचा टीकाकार नीळकंठभट्ट चतुर्भुज यानें वनपर्वांतील श्लोकाचा अर्थ निराळा लावून असें म्हटलें आहे कीं ज्यांना नैसर्गिक मृत्यु येईल त्यांनाच मोक्ष मिळतो. शिवाय तो म्हणतो कीं वृद्ध मातापितरें, पत्नी आणि मुलें यांना वाऱ्यावर सोडून प्रयागाला आत्महत्या करण्याचा कोणालाच अधिकार नाहीं. त्याचप्रमाणें जी स्त्री गर्भवती असून लहान मुलेंहि जिला आहेत आणि जिला पतीची परवानगी नाहीं अशा स्त्रीला कोणत्याहि हेतूनें प्रयागला आत्महत्या करतां येत नाहीं असें नारायणभट्टाचें मत आहे.

---

५. तस्मात् सर्वप्रयत्नेन तस्मिन् क्षेत्रे द्विजोत्तमाः।
देहत्यागो नरैः कार्यः सम्यङ् मोक्षाभिकांक्षिभिः ॥ – ब्रह्म. पु. १७७. २५

६. the psychological background behind the religious suicide at Prayag and other holy places is not difficult to realise. Centuries of philosophical thought had made a very deep impression on the minds of all people that the soul has to submit a never ending cycle of births and deaths. Ancient scriptures had offered a release in two ways viz. (1) by knowledge of ब्रह्मन् and by suicide at a holy place. Death had no great terror for the pilgrim who had submitted to various inconveniences and privations ungrudgingly. If one is determined to put an end to संसार by taking one's life, what nobler environment could have been imagined or indicated than at प्रयाग where the two mighty rivers गंगा and यमुना flowing from the sacred Himalayas Unite ?

... 'History of धर्मशास्त्र Vol. IV. P. 510



अनुक्रमणिका






**इटालियन प्रवासी अल्बेरुणी ( सन १०३० )** यानें भारतांतील आपल्या प्रवासाचें वर्णन लिहून ठेवलें आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं असाध्य रोगानें ग्रासलेला, जगाला कंटाळलेला, किंवा इतर भयंकर शारीरिक क्लेश पावणारा असाच मनुष्य देहार्पण करीत असे. असें देहार्पण करण्यापूर्वी कांहीं धार्मिक विधि करावा लागत असे. त्यानें आदले दिवशीं उपवास करून प्रायश्चित्त घ्यावें व इतर कोणी नातेवाईक नसल्यास पिंडदानापावेतों स्वतःचें श्राद्ध स्वतःच करण्याचा विधि असे! इतरांना कळण्यासाठीं मोठ्यानें संकल्प म्हणून आणि मग विष्णूचें ध्यान करून सर्वांसमक्ष प्रयागाच्या संगमांत देहार्पण करीत! अशाप्रकारें देहार्पण करणाऱ्या इसमाचें सुतक त्याच्या नातलगांनीं दहा दिवसांचे ऐवजीं तीनच दिवस पाळून चवथ्या दिवशीं श्राद्धविधि करावा असें शास्त्रांत सांगितलें आहे.

ही देहार्पणाची चाल भारतांत फार प्राचीन कालापासून दृष्टोत्पत्तीस येते. इ. स. पूर्व चवथ्या शतकांत तक्षशिला येथील कालवेश नांवाच्या एका नग्नसाधूनें ( Gymnasophist ) सत्तराव्या वर्षी अग्निकाष्ठें भक्षण करून देहत्याग केला. अलेक्झांडर बरोबर तो ग्रीस देशास गेला होता.[७] असह्य व्याधीमुळें तो जिवास कंटाळला होता. इतिहासकार स्ट्रॅनो लिहितो कीं भडोच येथील कोणी एक नग्न साधू झर्मोनिगस् अथेंस येथें आगस्टस सीझरकडे एका वकिलाबरोबर गेला होता. त्यानेंहि स्वतःला चितेंत जाळून घेतलें.[८] जैन अहिंसावादी असले तरी धार्मिक आत्मार्पणाला त्यांच्या धर्माची संमति आहे. त्याला ते ' सल्लेखना ' म्हणतात.

**देहार्पणाच्या मागचें तत्त्वज्ञान**

कर्म तीन प्रकारचें असतें. संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण. गीतेंत सांगितलें आहे कीं ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्मांचा नाश करतो.[९] ज्याप्रमाणें पद्मपत्राला जलबिंदु चिकटत नाहीं त्याप्रमाणें ज्याला ब्रह्मज्ञान झालें आहे त्याला दुष्कर्म चिकटत नाहीं. मनुष्याला जन्म प्रारब्धकर्मानें होतो पण ब्रह्मज्ञान झाल्यानंतर संचित व क्रियमाण अशा दोन्ही कर्मांचा नाश झाल्यावर मग मनुष्याला पुनर्जन्म कसा येणार ? कारण पुनर्जन्म हा कर्मावर अवलंबून असतो. अशी समजूत आहे कीं प्रयाग येथें मृत्यू आला असतां प्रत्यक्ष शिवच त्याच्या कानांत ब्रह्मज्ञान सांगतो! हा तारक मंत्र ' ओम् ' आहे. आणि मरतांना ' ओम् 'चा उच्चार झाला तर तो मनुष्य पुनः जन्माला येत नाहीं असें गीतावचन आहे.[१०]

असो. आतांपर्यंत प्रयाग येथें देहार्पण करण्याची प्रथा कशी पडली हें विस्तारानें सांगितलें. अलीकडे आत्महत्या—ती कोणत्याहि कारणानें जरी करण्याचा प्रयत्न—तरी तो गुन्हा समजला जाऊन त्याला शिक्षा ठेवली आहे तरी अशाप्रकारें देहार्पणाचे प्रकार अजूनहि घडतात. हृषीकेश येथें गंगेवर झुलता पूल आहे. त्यावर उभें राहून खाली गंगेच्या खळखळणाऱ्या प्रवाहांत अजूनहि लोक दरवर्षी देहार्पण करतात असें समजतें!

---

७. " Invasion of India by Alexander the Great " P. 386.
– by J. W. Mc cruidle

८. ' Invasion of India by Alexander ' P. 389

९. यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ।। – गीता ४. ३७

१०. ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।। – गीता



अनुक्रमणिका






### प्रयाग येथील उपतीर्थें

**अक्षयवट–** गंगा आणि यमुना यांच्या संगमावर अकबरानें बांधलेला किल्ला आहे. त्याच्या समोरच्या बाजूस एका अरुंद बोळांत हा वटवृक्ष आहे. आतां त्याचा बुंधाच आहे. गयेलाहि अक्षयवट आहे. अक्षयवटाखालीं गौतमबुद्धाला साक्षात्कार झाला तो अक्षयवट कोणता याबद्दल वाद आहे. संगमांत स्नान केल्यानंतर यात्रेकरू या वटवृक्षाचें दर्शन घेतात. येथें मृत्यू आल्यास मोक्ष मिळतो अशी श्रद्धा आहे.

एकंदर तेरा उपतीर्थें आहेत तीं सर्व येथें देण्याचें कारण नाहीं. त्यांपैकीं अक्षयवट, कोटितीर्थ, दशाश्वमेधक, प्रतिष्ठान, ऋणमोचन वगैरे अधिक प्रसिद्ध आहेत.

गंगायमुनांच्या संगमावर किल्ला आहे तो अकबरानें बांधला असें म्हणतात. दोन्ही नद्यांना पूर आले म्हणजे एका तटाला लागून गंगा वाहते व दुसऱ्या तटाला लागून यमुना वाहते ! माघ महिन्यांत सूर्य कुंभ राशींत प्रविष्ट झाला म्हणजे संगमांत स्नान करण्यासाठीं महिनाभर यात्रेकरूंची गर्दी असते. या यात्रेला ' माघमेळा ' म्हणतात. पण बारा वर्षांनी जेव्हां गुरु आणि रवि माघ महिन्यांत एकत्र कुंभराशींत येतात तेव्हां तो मोठा पर्वकाल समजला जातो व भारताच्या कोन्या कोपऱ्यांतून यात्रेकरू स्नानासाठीं जमतात. त्याला ' कुंभमेळा ' म्हणतात. हा पर्वकाल अर्थातच बारा वर्षांनीं येतो. सध्यां गुरु वृश्चिक राशींत आहे. आणखी तीन वर्षांनीं गुरु कुंभ राशींत जाईल तेव्हां कुंभमेळ्याची यात्रा भरेल. नऊ वर्षांपूर्वी असा मेळा भरला असतां चेंगराचेंगरींत अनेक माणसें मृत्युमुखीं पडल्याचें वाचकांच्या स्मरणांत असेलच. कुंभमेळ्यांत संगमांत स्नान करतेवेळीं प्रत्येकवेळीं कांहीं माणसें प्रवाहाबरोबर वाहत जाऊन खरोखरीचा त्यांना मोक्ष मिळतो ! पण बुडून मोक्ष मिळूं नये म्हणून स्वयंसेवकांचीं पथकें त्यांना वांचविण्याचा प्रयत्न करतात. तरीसुद्धां कांहीं वाहत जातातच. संगमानंतरचें जल शुद्ध गंगाजल समजलें जात नाहीं कारण त्यांत यमुनेच्या पाण्याचें मिश्रण असतें. म्हणून लोक ' गंगा ' आणतात तें पाणी गंगा यमुनेला मिळण्याच्या पूर्वीच्या प्रवाहांतील आणतात.

इंग्रज हिंदुस्थानांत आल्यापासून पाश्चात्य बौद्धिक शिक्षण बुद्धिवादी तत्त्वज्ञानाचें ( Rationalism ) मिळूं लागलें. बुद्धीपलीकडे भावना असल्याने बुद्धिवादी मनुष्यहि, ( कांहीं अपवाद सोडल्यास ) म्हातारपणीं कां होईना, काशी-प्रयागाला जाऊन संगमांत स्नान करतो ! त्यामुळें त्याला उच्चप्रतीचा निरतिशय असा आध्यात्मिक आनंद होतोच होतो !

इतर दृष्टीनें पाहतां प्रयागचें महत्त्व फार आहे पण प्रयागक्षेत्र या दृष्टीनें त्याला महत्त्व नसल्यानें येथें त्याचा विस्तार केला नाहीं. उदाहरणार्थ, अलाहाबादच्या किल्ल्यांत अशोकाचा स्तूप आहे. त्यावर तीन लिपींत तीन लेख आहेत. शेवटला लेख शहाजहान बादशहानें कोरविला म्हणतात. पुराणवस्तुसंशोधन या दृष्टीनें त्याचें महत्त्व आहेच आहे. पण यात्रेकरूंच्या दृष्टीनें त्याला कांहींच महत्त्व नाहीं.

हा लेख वाचून वाचकांपैकीं कांहींना जिज्ञासा म्हणून किंवा धार्मिक भावना म्हणून किंवा पुराणवस्तुसंशोधन म्हणून कां होईना प्रयागास जाण्याची इच्छा व्हावी अशी आशा व्यक्त करून हा लांबलेला लेख येथें संपवितों.

---

अनुक्रमणिका








## वाचकांचा पत्रव्यवहार –

### महामंडळाची लेखनपद्धति

श्री. संपादक 'नवभारत' यांस स. न. वि. वि. 'नवभारत'च्या ऑक्टोबर १९६१ च्या अंकांत श्री. ग. मो. पाटील यांचा 'मराठी व्याकरणाची पुनर्रचना' हा लेख वाचला. मराठी भाषेचें आजचें व्याकरण "संस्कृत भाषेच्या व्याकरणाच्या दृष्टीनें मराठी भाषेची कशी मांडणी करतां येईल" या अनुसंधानानें रचलें गेलें आहे, "संस्कृत भाषेचें व्याकरण मराठी भाषेवर लादण्याचा प्रयत्न" आजवर झाला आहे, असें लेखकानें म्हटलें आहे. संधिप्रकरणासारख्या बाबींना मराठी व्याकरणांत जें स्थान लाभलें आहे तें पाहतां श्री. पाटील यांचें म्हणणें रास्तच ठरेल. मराठी भाषेचाच स्वतंत्रपणें अभ्यास करून मराठीच्या व्याकरणाची पुनर्रचना करणें आवश्यक व निकडीचें आहे हा त्यांचा आग्रह आज पटण्यासारखा आहे. प्रा. मंगळूरकर यांनीं पुणें विद्यापीठातर्फे नुकत्याच दिलेल्या न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमालेंत हाच मुद्दा मांडलेला आढळतो आणि श्री. कालेलकर यांनीं 'सत्यकथें'त सन १९५४ आणि सन १९५८ मध्यें लिहिलेल्या भाषा, बोली व लेखन या संबंधींच्या लेखांतून व्याकरण आणि लेखन या दोन्हींच्या अशा पुनर्रचनेचें तत्त्व मांडलेलें आढळतें.

मराठी भाषा आतां राज्यव्यवहाराची भाषा झाली आहे आणि साक्षरतेच्या व शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें ती ज्ञानसंपादनाची भाषा म्हणूनहि प्रगल्भ होत आहे. अशावेळीं तिला स्वयंप्रभुत्व लाभणें आणि इंग्रजीच्या दडपणाखालून व संस्कृतच्या वरचष्म्यांतून तिची सुटका होणें हें अटळ आहे. सन १८७४ मध्यें विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं मराठीच्या अभिमानाचें बीज रुजविलें, पण तें उगवून वाढीला लागण्यास अनुकूल परिस्थिति नंतर लाभली नाहीं. ती आतां लाभत आहे. मराठी व्याकरणाचें 'मराठीकरण' करण्याचा आजचा प्रयत्न त्यामुळेंच होत आहे. अशा वेळीं मराठीलेखनपद्धतीचाहि असाच फेरविचार होणें क्रमप्राप्त होतें, आणि त्या दिशेनें झालेल्या प्रयत्नाचें फळ म्हणजेच मराठी साहित्य महामंडळानें आपल्या घटकसंस्थांच्या अनुमतीनें सर्वसंमत अशी केलेली लेखन-नियमावलि होय. सर्व महाराष्ट्रामध्यें राज्यव्यवहारांत, शिक्षणक्रमांत, आणि ज्ञानप्रसारांत जी **ग्रांथिक भाषा** वापरली जाते तिचें लेखन यापुढें या एकाच नियमावलीनुसार होणें सोयीचें व म्हणून आवश्यक होणार आहे. त्यामुळें तीन तऱ्हेच्या नियमांनीं आज होणाऱ्या लेखनाचें अराजक संपेल. प्रादेशिक बोलभाषेंतील लकबी यामुळें नाहींशा होणार नाहीत व त्या नाहींशा झाल्या पाहिजेत असेंहि नाहीं. उलट, ग्रांथिक भाषा व बोली यांची देवघेव आणि परस्परांवर प्रभाव होत राहून एकंदर मराठी भाषा जास्त जास्त संपन्न होत राहीलच; परंतु, ग्रांथिक भाषेला सापेक्षतः स्थैर्याची आवश्यकता असते व ती लाभण्यासाठीं आज सर्वसंमत लेखनपद्धति सर्वांनीं कांटेकोरपणें पाळणें इष्ट ठरतें.

महामंडळानें सिद्ध केलेल्या नियमावलींतील अनुच्चारित अनुस्वार गाळण्याचा नियम आणि ऱ्हस्वान्त इ व उ असलेल्या तत्सम शब्दांतील इ व उ यांना दीर्घान्त लिहिण्याचा नियम ह्या दोन नियमामुळें तिच्यावर कांहींजणांकडून आक्षेप घेतले जात आहेत व तें साहजिक आहे. अनेक वर्षांच्या संवयीविरुद्ध हे नियम आहेत व तत्समांबद्दलच्या नियमामुळें संस्कृत भाषेवर हें आक्रमण आहे किंवा तिचें पावित्र्य घालविण्यासारखें आहे अशी भावना होणें शक्य आहे. परंतु मराठी भाषेनें आपले नियम कसेहि केले तरी त्यामुळें संस्कृत भाषेला धक्का लागेल ही कल्पनाच मुळांत बरोबर नाहीं. संस्कृत ही गीर्वाणभाषा व देवांची भाषा म्हणून भारतांत मान्यता पावली व आज जगभर तिला मान्यता आहे. तिचें श्रेष्ठत्व त्या भाषेंत रचि-



अनुक्रमणिका

लेल्या अध्यात्म, धर्म, काव्य इत्यादि विषयांवरील अभिजात ग्रंथांमुळें आहे. मराठी किंवा इतर भारतीय भाषांतून वापरले जाणारे संस्कृत शब्द लिहिले कसे जातात, उच्चारिले कसे जातात व त्यांचीं लिंगें व अर्थ बदलतात कीं तसेच राहतात, यावर संस्कृतचें गौरवास्पद स्थान, पावित्र्य आणि भविष्य अवलंबून कसें राहील ? इंग्रजीचें माहात्म्य तिच्यामुळें प्रभावित झालेल्या भाषांवर किंवा 'बुटलेरी' इंग्रजींतील भल्याबुऱ्या प्रकारांवर अवलंबून नाहीं, तोच प्रकार कोणच्याहि भाषेचा मानावा लागेल. सारांश, मराठींत तत्सम शब्दांचें लेखन संस्कृतप्रमाणें होणें किंवा न होणें यामुळें संस्कृत भाषेच्या अभिमान्यांनीं आपलें मन व्यथित होऊं देणें युक्त ठरणार नाही.

आतां मराठीपुरताच हा प्रश्न आहे हें मान्य केल्यावर तत्समांच्या बाबतींत महामंडळानें केलेला नियम योग्य का अयोग्य तें पाहण्याची कसोटी एकच उरते. ती म्हणजे मराठीच्या उच्चारविशेषांची. मराठींत इ व उ हे स्वर दीर्घान्त असतात हें स्पष्ट आहे आणि म्हणूनच त्यांचें लेखन दीर्घान्त करणें मराठीला धरून आहे. तोच नियम करणें हेंहि मग रास्तच ठरतें. महामंडळानें हा नियम करतांनाहि त्यांत असें म्हटलें आहें कीं असे शब्द 'प्रथमेंत' दीर्घान्त लिहावे; म्हणजे कोशामध्यें किंवा धड्यांच्या किंवा निबंधांच्या शीर्षकामध्यें हे शब्द ऱ्हस्वान्त राहतील. (लोकमान्यांनीं सन १९०४ मध्यें याच प्रकारची सूचना केली होती. – लो. टिळकांचे केसरींतील लेख, भाग ४, पान ४०७) परंपरेचा विचारहि हा नियम करतांना जमेस घेतला गेला आहे हें यावरून दिसून येईल.

अनुस्वारांचो प्रश्न सन १९२८ मध्यें श्री. न. चिं. केळकर यांनीं पुढें आणला. पण मडगांवच्या साहित्य संमेलनामध्यें अनुच्चारित अनुस्वारहि द्यावे असें ठरून सन १९३० पासून हा नियम जारी राहिला. परंतु प्रत्यक्ष अनुभव मात्र वेगळाच आला. मराठीचें अध्यापन करणाऱ्यांच्या हें लवकरच लक्षांत आलें कीं असे 'अनुस्वार ठेवण्याचा प्रयत्न कधींहि यशस्वी होणार नाहीं.' प्रा. शं. दा पेंडसे यांनीं अमळनेरला साहित्य संमेलनाच्या अध्यापन शाखेच्या अध्यक्षीय भाषणांत या बाबतींत फेरविचार करण्याची शिफारस केली. सन १९५२ मध्यें विदर्भ साहित्य संघानें आणि सन १९५३ मध्यें महाराष्ट्र साहित्य परिषदेनें लेखनपद्धतींत फेरविचार करण्यासाठीं समित्या नेमल्या व तेव्हांपासून एकंदर लेखनाच्या फेरविचाराचा प्रश्न चर्चिला गेला. या दीर्घ चर्चेतूनच आज महामंडळाचे नियम निष्पन्न झाले आहेत व महामंडळाच्या प्रतिनिधींमध्यें जी एकवाक्यता साधली गेली तीहि या दीर्घ चर्चेचाच परिपाक होय.

आतां खरा प्रश्न असा आहे कीं सर्व लिखित, आणि विशेषत: मुद्रित, ग्रांथिक भाषेमध्यें महामंडळाच्या नियमावलीचा वापर होण्यासाठीं जे प्रयत्न हवेत ते कोणी करावयाचे ? आणि जी नियमबद्ध लिहिण्याविषयींची आस्था हवी ती कोणी उत्पन्न करावयाची ? प्राथमिकपासून वरपर्यंतच्या अध्यापनाचें काम करणाऱ्यांकडे याची जबाबदारी आहे तशीच ती नियतकालिकांच्या व वृत्तपत्रांच्या संपादकांवर आणि लेखकांवरहि आहे. ग्रांथिक मराठीचें लेखन नियमबद्ध होण्यास कालावधि लागेलच, पण तो शक्य तेवढा कमी करण्याची जबाबदारी आपण सर्वांनीं उचलली पाहिजे.

– दि. के. बेडेकर





अनुक्रमणिका

## पुस्तक-परीक्षण –

### The Buddha & His Dhamma

( by. B. R. Ambedkar M. A. Phd. Dsc. LLD. D. Litt. Barrister-at-Law. Siddharth College Publication I. )

हा ग्रंथ किती योग्यतेचा आहे त्याचें आकलन ज्यानी बुद्धधर्म व बुद्धवाङ्मय ह्याचा सखोल अभ्यास केला आहे त्यानाच फक्त उमजेल. ग्रंथाची रचनाच अशी आहे कीं ग्रंथकर्त्याची विद्वत्ता, त्याची संशोधनदृष्टि, त्याची तात्विक पातळी सहजासहजी डोळयांत भरणारी नाहीं. ह्यांतच ग्रंथाचा व ग्रंथकर्त्याचा मोठेपणा दिसून येतो. प्रस्तुत ग्रंथाचा प्रमुख उद्देश सर्वसाधारण जनतेचे विचार परिवर्तन घडवून एक दूरगामी सामाजिक व नैतिक क्रांति घडवून आणणें हा आहे. ग्रंथाचें स्वरूप ह्या उद्देशास अनुसरून आहे व तो उद्देश किती सफल होणार हें हिंदुसमाजाच्या जिवन्तपणावर व नैतिक जागरुकतेवरच अवलंबून राहणार आहे.

ग्रंथ संशोधनात्मक असून संशोधनाचें स्वरूप नाहीं ह्याचें कारण असें आहे कीं वादग्रस्त विषय किंवा अनुमानें वादग्रस्त स्वरूपांत न मांडता ग्रंथकर्त्यानें साधक बाधक प्रमाणांचा मनांत विचार करून आपले निर्णय सूत्ररूपानें जगासमोर काळजीपूर्वक मांडले आहेत. तथापि ठिकठिकाणी बुद्धाचे विचार व सिद्धांत हे किती क्रांतिकारक व मूलगामी होते हे स्पष्ट करण्याकरितां त्या काळीं व आजहि हिंदुसमाजांत प्रचलित असलेली परंतु बुद्धास अमान्य व त्याज्य वाटणारीं विरोधक मतें ठसठशीतपणें दिग्दर्शित केलेलीं आहेत. ईश्वराचें व आत्म्याचें अस्तित्व, पुनर्जन्म व कर्मविपाक; लौकिकधर्म व बुद्धाचा धम्म ह्यांतील फरक हीं सर्व प्रकरणें ग्रंथाच्या मार्मिकतेची व अनुपमेय स्वरूपाचीं उदाहरणेंच होत.

आपलीं सूत्रें मांडताना बहुतेक ठिकाणीं बुद्धाची शिकवणूक बुद्धाच्याच शब्दांत सांगण्याची ग्रंथकर्त्यानें पराकाष्ठा केली आहे. बुद्धाचे सर्व संवाद-परिसंवाद एकत्र आणून त्यांची विषयवार व संगतवार मांडणी करणें हें कांहीं लहानसहान कार्य नव्हें. हा ग्रंथ काळजीपूर्वक वाचल्यावर बुद्धाची एकंदर शिकवणूक काय होती व पुढें उपस्थित झालेल्या परस्परविरोधी समजूती किती निराधार आहेत ह्याविषयीं बहुतेक संशय फिटावे असा हा बहुमोल ग्रंथ आहे.

महाराष्ट्रानें आपल्या महान् पुरुषांची सर्वसाधारणपणें उपेक्षाच केलेली आहे. फुले ह्या क्रांतिकारक पुरुषाची महत्तता मान्य होण्यास दोन चार पिढ्या जाव्या लागल्या. आंबेडकरांच्या बाबतींत हा प्रमाद अत्यंत मोठ्या प्रमाणावर व उघड्या डोळयांनीं घडलेला आहे. ह्या उपेक्षेंत बाबासाहेबांच्या वैयक्तिक गुणदोषांचा थोडा भाग असेल नाहीं असें नाहीं. परंतु हे वैयक्तिक गुणदोष विशिष्ट पुरुषांच्या बाबतींतच नडतात, इतरांच्या नाहीं हा फार विचारणीय विषय होय. मराठी समाजाच्या विशिष्ट थरांत जी एक जुनी पुराणी, निर्मूल व मूर्खपणाची अहंमन्यता पसरलेली होती व आजहि आहे ती काळाच्या ओघाबरोबर अथवा सामाजिक उत्पातानी जशी ओसरून जाईल तसतशी बुद्धवासी आंबेडकर हा एक महान् माणूसच नव्हे तर महाराष्ट्रापुरतातरी महान् युगपुरुष होऊन गेला हें सर्वांस पटल्याशिवाय राहणार नाहीं असा प्रस्तुत लेखकाचा विश्वास आहे.

उशीरा कां होईना परंतु ह्या ग्रंथकर्त्याची महत्तता स्वीकृत करणें महाराष्ट्रास सहज साध्य आहे. प्रस्तुत ग्रंथ इंग्रजींत आहे. पृष्ठसंख्या सहाशें, मूल्य रुपये पंचवीस व प्रती फक्त पांचशेंच असल्याकारणानें सर्वसाधारण मराठी वाचकाच्या शक्तीबाहेरचेंच कार्य आहे. इतका समयोचित वा गाढ ग्रंथ, कीं ज्याची योग्यता बायबल, कुराण वा भगवद्गीता ह्यांच्या पायरीचीच आहे, तो सर्वसाधारण जनतेला उपलब्ध होऊं नये हा दैवदुर्विलासच होणार आहे. तेव्हां ह्या ग्रंथाचें ताबडतोब मराठी भाषांतर करून तो प्रत्येक मराठी घरांत प्रविष्ट केला तर बाबासाहेबांचें महाराष्ट्रावरील ऋण अंशतः तरी फेडलें असें होणार आहे.

– सुमंत मुरंजन











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष